# श्रीगजानन विजय कथासार



प्रकाशक : तन्वी हर्बल्स

तन्वी १ घंटाळीप्रसाद, घंटाळी रोड,

घंटाळी मंदिराच्याबाजूला, घंटाळी

ठाणे (प) ४००६०२

# श्रीगजानन विजय कथासार

## अनुक्रमणिका ...

|| श्री ||

|| ॐ नमो भगवते वासुदेवाय ||

|| ॐ नमो गजानन ||

|| ॐ नमो मुसळादेवी ||

सौ. मानसी धामणकर हिने श्री गजानन महाराजांच्या दासगणू विरचित पोथीचे मराठीमध्ये कथासाररुपी रुपांतर केले आहे. त्यासाठी तिला खूप-खूप शुभेच्छा व आशीर्वाद.

श्री गजानन महाराजांची लीला अगाध आहे. महाराजांची श्रद्धेने उपासना केली की, महाराज नेहमीच पाठीशी उभे राहतात व आयुष्यामध्ये योग्य मार्ग आपल्याला दाखवत असतात.

सौ. मानसीच्या हातून हे सत्कार्य होणे हीसुद्धा महाराजांची कृपा आहे. महाराजांची अशीच कृपा तिच्यावर कायम राहो व असेच वेळोवेळी तिच्या हातून सत्कार्य होवो ही महाराजांच्या चरणी व ईश्वरचरणी प्रार्थना.

सदर कथासार पोथीचे आताच्या तरुण पिढीमध्ये जास्तीत जास्त वाचन होवो ही प्रार्थाना, कारण आज जगामध्ये तरुण पिढीसमोर विविध आव्हाने व चिंता सतावत आहेत. अशावेळी मानसिक शांततेसाठी अध्यात्माची जोड असणे नितांत गरजेचे आहे, जेणेकरुन मानसिक शांतता लाभून तरुण पिढी सत्मार्गावर राहू शकेल.

पुन्हा सौ. मानसीला खूप-खूप शुभेच्छा आणि महाराजांची तिच्यावर व तिच्या कुटुंबावर कायम कृपा राहो ही ईश्वरचरणी प्रार्थना.

गिरीश प्रभाकर मेहेंदळे

सौ. मानसी धामणकर मेहेंदळे हिने शेगावचे गजानन महाराज यांच्या ‘श्री गजानन विजय’ या ग्रंथाच्या आधारे रसाळ वाणीत २१ अध्यायरूपी कथासार लिहून गजानन महाराजांची खूप मोठी सेवा केली आहे. तसेच हे कथासार शालेय विद्यार्थ्यांसाठीही खूप उपयुक्त आहे. अध्यात्माची गोडी निर्माण करून परमेश्वराची भक्ती करत आपले जीवन नीतिमधर्माने व्यतीत करण्यास हे कथासार आपल्याला प्रवृत्त करते. मानसीला तिच्या मातुल घराण्यातूनच हा आध्यात्माचा वारसा लाभला आहे. तिचे आजोबा वैकुंठवासी डॉ. सी. ग. देसाई यांचे अध्यात्मावर अनेक ग्रंथ प्रकाशित झालेले आहेत. ते संस्कृत भाषेतील विद्वान म्हणून गणले जात. तिची आई सौ. मेधा मेहेंदळे या तन्वीशताच्या संस्थापक असून त्यांनी अनेक सामाजिक लोकोपकारक कामे केलेली आहेत. मानसीचे वडील गजानन महाराजांचे परमभक्त आहेत. अशा अध्यात्मिक वातावरणामुळेच सौ. मानसीकडून श्रीगजानन विजय कथासार लिहून झाले आहे.

सौ. मानसी स्वतः बदलापूरच्या कृष्णलीन प. पू. लीलाताई कर्वे यांना गुरुस्थानी मानते. त्यामुळे भगवान श्रीकृष्ण हे तिचे आराध्य दैवत आहे.

सर्व संत, महात्मे हे एक प्रकारे श्रीकृष्ण परमात्म्याच्या विभूतीच होत त्यामुळे त्यांची केलेली सेवा, उपासना ही एक प्रकारे त्या कृष्ण परमात्म्यालाच पोहोचते.

सौ. मानसीला तिच्या पुढील आध्यात्मिक व व्यावहारिक वाटचालीसाठी खूप खूप शुभेच्छा !

।। ॐ नमो भगवते वासुदेवाय ।।

श्री. प्रकाश गाडगीळ

## श्रीगजानन विजय कथासार - अध्याय १ला

श्रीगणेशाचे स्मरण करुन श्रीगजानन विजय कथासाराच्या प्रथम अध्यायाला सुरुवात करुया. विघ्नहर्त्या गणेशाचे स्मरण केल्याने आपलं कार्य सुफळ संपूर्ण होणार. दासगणू महाराजांच्या पोथीने प्रेरित होऊन मी मानसी ह्या कथासाराचे लेखन करण्यास सुरुवात करते. मुसळादेवी व महालक्ष्मीदेवी ह्या माझ्या कुलस्वामिनी त्यांना प्रथम वंदन. माझ्या गुरु प. पू. लीलाताई कर्वे ह्यांनाही वंदन करते. 'कृष्ण' माझं उपास्य दैवत. माझा कर्ताकरविता. त्याच्या आशीर्वादाने ही प्रेरणा मला मिळत आहे. गजानन महाराज माझ्या बाबांचे श्रद्धास्थान. गिरीश माझे तात, मेधा माझी माता, त्यांच्या पुण्याईनेच मला जगण्यातला खरा आनंद उमजला. महाराजांची कृपा अशीच राहो, सर्व भक्तांवरी हीच इच्छा आहे अंतरमनी.

आता सुरुवात करुया ऐकायला कथासार. शके १८०० मध्ये माघ वद्य सप्तमीला गजानन महाराज शेगावी अवतरले. देविदास नावाचे एक गृहस्थ होते. त्यांच्या मुलाची ऋतुशांत होती. पातुकरांच्या वंशातील हे देविदास खूप सज्जन होते. भोजनाची मोठी मेजवानी होती खास त्यांच्या घरी. त्यामुळे बाहेर उष्ट्या पत्रावळी रस्त्यावर पडलेल्या होत्या. 'गजानन' महाराज त्या पत्रावळ्यांच्या मध्येच बसले होते. त्यांवरील उरलेल्या अन्नाचे ते सेवन करत होते. त्यांच्या अंगी एक बंडी होती. जुन्यापुराण्या कापडाची. आणि पाणी पिण्यासाठी एक कमंडलू होता. कच्ची चिलीम त्यांच्या हातात होती. दिगंबर अशी महाराजांची मूर्ती होती. शांत एकदम. त्यांचे तेज दुरुनसुद्धा जाणवत होते. अन्नामध्ये आवडनिवड काहीच नव्हती. सगळा भाव एक होता. अन्न हे

पूर्णब्रह्म ह्या उक्तीचा खरा अर्थ इथे समजतो. तर त्याच रस्त्याने बंकटलाल आगरवाला जात होता. तो तो प्रकार पाहून गोंधळला. त्याला आश्चर्य वाटले. मनात तो म्हणाला की, देविदास तर सज्जन आहेत. ह्याला हवं असेल जेवण तर ते देतील. मग हा असा पत्रावळ्यांवर का जेवतो आहे ?

दामोदरपंत कुलकर्णी हेसुद्धा बंकटलालबरोबर होते. त्यांनी देविदास ह्यांना सांगून जेवणाचं पान महाराजांसाठी वाढून घेतले. त्यांनी खूप आनंदाने प्रेमाने दिले. भव्य अशी महाराजांची छाती होती. पिळदार असे दंड. महाराजांनी सर्व जेवण एकत्र केले आणि महाराज अन्न सेवन करीत होते.

तेव्हा बंकटलाल पंतांना म्हणाले की, आपण उगीचच ह्यांना वेडा असं म्हणालो. आपली चूक झाली. शेगावामध्ये आज खरंच पुण्याचा दिवस की आज गजानन महाराज इथे अवतरित झाले. खरंच धन्य अपुले शेगाव.

महाराजांचे जेवण झाल्यावर दामोदरपंतांनी विचारले, जेवण झाले. मग आता पाणी देऊ का आणून ?

महाराज दोघांना म्हणाले, तुम्हांला गरज असेल तर द्या आणून. दामोदरपंत पाणी आणण्यासाठी घरात गेले. तेवढ्यात महाराज जनावरांना प्यायला पाणी ठेवले होते त्यातील गढूळ पाणी प्यायला गेले. पंत महाराजांना म्हणाले, महाराज, ते नको, हे पाणी प्या - गोड निर्मळ थंडगार. वाळा घातलेलं छान... महाराज म्हणाले, अरे ह्या सगळ्या व्यावहारिक कथा मला नका सांगू. सर्व चराचरात ब्रह्म आहे. तिथे काय गढूळ, निर्मळ. हा भेद इथे राहत नाही. सुवास, कुवास, गढूळ, निर्मळ ही सर्व एकच रुपे. ईश्वराची अगाध लीला ह्या

नरजन्मामध्ये नाही कळणार. दोघंही ऐकून अगदी अनन्य भावाने महाराजांना लोटांगण घालावयास पुढे झाले. त्यांना गहिवरून आले होते. त्यांच्या मनीचा हा हेतू जाणून महाराज वायूच्या गतीने अदृश्य झाले. त्यांना अडथळा कोण? अशा रितीने गजानन कथासाराचा प्रथम अध्याय इथे संपूर्ण झाला.



# श्रीगजानन विजय कथासार - अध्याय २रा

श्रीगणेशाला वंदन करुन द्वितीय अध्यायाला सुरुवात करुया. महाराजांचं दर्शन झाल्यापासून बंकटलालच्या मनात त्यांची ओढ निर्माण झाली. अन्न-पाणी त्याला गोड लागत नव्हते. महाराजांचा ध्यासच त्यांच्या मनाने घेतलेला. जिकडे-तिकडे महाराजच त्याला दिसत होते. वडिलांना ही सगळी गोष्ट सांगण्याचे धारिष्ट्य बंकटलालचे होत नव्हते. अख्ख्याया शेगावात त्याने महाराजांना शोधलं, पण महाराज कुठेही सापडले नाहीत. घरी आल्यावर बंकटलालचे वडील भवानीराम जे होते त्यांनी बंकटलाल ह्याला विचारलं, अरे बाळा काय झालं ? असा अस्वस्थ का दिसतोयस ? मन तुझे चंचल का ? काही त्रास होतोय का ? तुझ्यामध्ये उत्साह का नाहीये ? हे बघ, आपल्या वडिलांपासून काही लपवून ठेवायचं नसतं. जे काही मनात असेल ते मला सांग. पण बंकटलालला वडिलांना सांगायला काही जमले नाही. काहीतरी सांगून त्याने ती वेळ पुढे ढकलली.

बंकटलालच्या शेजारी एक रामाजीपंत देशमुख नावाचे गृहस्थ राहत होते. वयाने वृद्ध होते. मोठ्या घराण्यातील असूनही अजिबात अहंकार त्याना नव्हता. बंकटलालने त्याच्या जे काही मनात होते ते सर्व त्यांना वर्णन करुन सांगितले. हे सगळं ऐकून त्यांनाही आश्चर्य वाटले. ते म्हणाले, अरे तू जे सर्व हे सांगितलंस ते ऐकून वाटतंय की, हा कोणीतरी योगी असावा. तुला त्यांचं दर्शन लाभलं. बाळा, खरंच तू धन्य झालास. परत तुला त्यांचं दर्शन झालं तर मलाही त्यांना भेटायला नक्की ने. अशात चार दिवस निघून गेले. बंकटलालास ह्या गोष्टीचा तिळभर विसर पडला नव्हता.

वऱ्हाडप्रांतात गोविंदबुवा टाकळीकर होते कीर्तनकार. ते फिरत-फिरत शेगावी आले. शंकराच्या मंदिरात छान कीर्तनाची तयारी झाली.

बंकटलालही तिथे कीर्तन ऐकण्यासाठी जात होता. वाटेमध्ये पितांबर शिंपी त्याला भेटला.

पितांबर शिंपी हा भोळा भाविक होता. मनाने एकदम साधा होता. बंकटलालाने त्याला महाराजांविषयी सर्व हकिकत सांगितली. अवचित समर्थ तेवढ्यात त्यांना मंदिराच्या मागे फरशीवर बसलेले दिसले. चातक पक्षी कसा पावसाची वाट पाहत असतो आणि पाऊस सुरू झाल्यावर त्याला कसा आनंद होतो, तसा आनंद बंकटलाल व पितांबरास झाला. दूर उभं राहून ते महाराजांना वदले, ''महाराज, काही खाण्यासाठी आणू का हो?'' महाराज त्यावर म्हणाले, ''तुला गरज असेल तर आण. माळणीच्या घरातून झुणका भाकरी घेऊन ये''. बंकटलाल लगेच गेला आणि महाराजांच्या हातावर अर्धी झुणका भाकरी आणून ठेवली. महाराज भाकरी खाता-खाता पितांबरास म्हणाले, ''ओढ्यामधून तुंबा भरून पाणी घेऊन ये''. पितांबर म्हणाला, ''गुरुराया अहो ओढ्यात पाणी एकदम कमी आहे. त्यात तुंबा (तांब्या) बुडू शकणार नाही. गुरांनी तोंड लावलेलं पाणी आहे ते तुमच्या पिण्यायोग्य नाही हो ते. तुमची मर्जी असेल तर दुसरीकडून हे सुवासित जल आणू का?'' महाराज म्हणाले, ''दुसरे पाणी नको आंम्हाला. नाल्याचेच पाणी आण. पाण्यात सरळ तुंबा बुडव. उगीच ओंजळी ओंजळीने भरू नकोस''. तुंबा घेऊन लगेचच पितांबर शिंपी नाल्यावर गेला. पण त्या नाल्यामध्ये तुंबा भरेल इतके पाणी त्याला दिसले नाही. तळपाय उभे राहिल्यावर बुडतील एवढेच पाणी होते. महाराजांनी तर सांगितले होते की, तिथूनच पाणी आण. इकडे आड तर तिकडे विहीर अशी परिस्थिती पितांबराची झाली. मनात चिंतातुर होऊन त्याने तो तुंबा पाण्यात बुडवला तर खळगा पडून स्फटिकासमान शुद्ध पाणी तुंब्यामध्ये भरले गेले. मनातून खुप आश्चर्य वाटले त्याला. जेव्हा भगवंताची इच्छा असते तेव्हा सर्व शक्य

असते. फक्त आपला भाव मनापासून हवा. महाराजांपुढे तुंबा त्याने आणून ठेवला. झुणका भाकरी माळिणीकडची खाऊन महाराज प्रसन्न झाले व बंकटलाल कडे सुपारी मागू लागले. बंकटलालने खिशातून सुपारी काढून फोडली व महाराजांच्या हातावर ठेवली व त्याबरोबर दोन पैसे पण ठेवले. पैसे पाहून महाराज हसून म्हणाले, ''अरे तुला मी काय व्यापारी वाटलो का म्हणून तू मला ही नाणी अर्पण करतोयस. ही नाणी व्यवहारी माणसाची गरज आहे. मला त्याची अजिबात गरज नाही. भाव-भक्तीच्या नाण्यांवर मी संतुष्ट असतो. तुझ्याकडे तो भक्तिभाव होता म्हणून मी तुला परत भेटलो. ह्याचा मनामध्ये विचार कर. म्हणजे तुला समजेल आणि जे कीर्तन ऐकण्यासाठी तुम्ही आलात ते ऐक जा. मी इथे लिंबापाशी बसून कथा ऐकतो''. दोघे जण कीर्तन ऐकण्यासाठी गेले. महाराज लिंबाच्या झाडापाशी बसले होते. गोविंदबुवांचे कीर्तन सुरू झाले. भागवतामधील अकराव्या स्कंधामधील श्लोक आरंभीच्या निरुपणासाठी घेतला होता त्यांनी. बुवांनी पूर्वार्ध सांगितला आणि तिथून महाराजांनी उत्तरार्ध संपूर्ण केला. ते ऐकून गोविंदबुवा एकदम मनी घोटाळले की, हा उत्तरार्ध सांगणारी व्यक्ती खरी अधिकारी आहे. बंकटलाल व पितांबराला म्हणाले, ''जा-जा त्यांना कीर्तन ऐकण्यासाठी घेऊन या''. बंकटलाल, पितांबर व इतर मंडळी महाराजांना विनंती करण्यासाठी गेली. पण महाराज तर बसल्या जागेवरुन उठायला तयार नव्हते. शेवटी स्वतः गोविंदबुवा तिकडे आले. हात जोडून महाराजांना म्हणाले, ''एकदा कृपा करा, या ना शिवाच्या मंदिरात. तुम्ही साक्षात परमेश्वर. मंदिर सोडून तुम्ही इथे बसणे बरे नव्हे. माझी पूर्वजन्मीची पुण्याई म्हणून आज तुमचे दर्शन झाले. गुरुमाऊली आज खरी मला कीर्तनाची फलप्राप्ती झाली''. हे ऐकून महाराज गोविंदबुवांना म्हणाले, तुझ्या बोलण्यात एकवाक्यता ठेव. जे इतरांना सांगतोस

त्याचे तू स्वतः पहिले आचरण कर. सगळ्यांना सांगतोस ना ईश्वर सगळीकडे आहे, मग असा हट्ट का करतोयस आज? भागवतामधील श्लोक सांगतोस व त्याच्या विरुद्ध वागतोस? पोटभऱ्या कथेकऱ्यासारखं नको करुस.जा आधी जाऊन कीर्तन समाप्त कर. मी इथून ऐकतोय.

बुवा कीर्तन करण्यासाठी मंदिरात आले. गर्जना करुन, मोठ्याने सगळ्यांना म्हणाले, ''तुमच्या शेगावी हे अनमोल रत्न आले आहे. त्याचा सांभाळ करा. साक्षात परमेश्वर इथे अवतरला आहे''.

तुमच्या सर्वांचे कल्याण निश्चित आहे. त्याची आज्ञा वेदासमान माना असं कीर्तनामधून सगळ्यांना सांगत होते. कीर्तन संपल्यावर सगळे जण घरी गेले. बंकटलाल खूप आनंदित होता. त्याने घरी जाऊन आपल्या वडिलांना सगळी हकिकत वर्णन केली. भवानीराम प्रेमाने म्हणाले, बाळा, तू खरंच गुरुमाऊलीना घरी घेऊन ये. पुढे चार दिवसांनी माणिक चौकात संध्याकाळी बंकटलालच्या भक्तिभावामुळे निर्माण झालेल्या भाग्यामुळे बंकटलालला महाराज तिथे दिसले. गुराखी गाईंना घेऊन जात होते. समर्थांच्या आजूबाजूला गाई जमत होत्या. असं वाटत होतं, जणू नंदसुत कृष्णच तिथे उभा आहे. सगळीकडे तिन्हीसांजेला देवापुढे दिवा लावण्याची तयारी सगळ्या दुकानांमध्ये सुरू होती. अशा वेळी बंकटलाल महाराजांना घेऊन घरी आला. वडिलांना खुप आनंद झाला. साष्टांग नमन करुन महाराजांना त्यांनी पाटावर बसवले. हात जोडून म्हणाले, प्रदोषकाळी आपलं आगमन झालं आहे. साक्षात् महादेव तुम्ही. मी अशी स्कंद पुराणाधील कथा ऐकली आहे.

प्रदोष काळी जो शिवआराधना करतो तो भाग्यशाली असतो. असे म्हणून त्यांनी बेलाचे पान महाराजांना अर्पण केले. स्वयंपाक व्हायला वेळ होता आणि जेवण वेळेत नाही मिळाले तर पार्वतीकांत प्रदोषकाळी उपाशी

निघून गेला असं होईल. खूप लोक जमले होते. आता काय करायचे असा मनात विचार करताना, दुपारच्या पुऱ्या घरी होत्या त्या समर्थांपुढे ठेवल्या. महाराज मनातील भाव नक्की ओळखतील मी मुद्दाम त्यांना दुपारचे शिळे देत नाही आहे, हे ते जाणतील. पुऱ्या, बदाम, केळी, मोसंबी, मुळे असे सर्व छान ताटात ठेवले. त्यांना कपाळावर बुक्का लावला. पुष्पमाला गळ्यात घातली. गुरुमाऊली खूप प्रसन्न दिसत होत्या. जे - जे पानात पडेल तेते भराभर खात होत्या. उदरात ३ शेर अन्न साचवले. रात्रभर महाराज तिथेच राहिले. दुसऱ्या दिवशी मंगलस्नान महाराजांना घातले. त्याचा थाट काय वर्णू.

गरम पाण्याच्या १०० घागरी होत्या. स्त्री-पुरुष भक्तिभावाने पाण्याचा अभिषेक करून महाराजांना स्नान घालत होते. कुणी शिकेकाई लावत होते, कुणी साबण, कुणी उठणे लावून मर्दन करत होते. समर्थांच्या पदकमलाला दवणा-हिना किंवा चमेलीचे तेल लावत होते. अशा प्रकारे स्नानविधी संपला. महाराजांना पितांबर वस्त्र नेसवलं. योगिराजांना सन्मानाने गादीवर बसवले, कपाळावर केशरी गंध लावले, गळ्यात वेगवेगळे हार घातले, तुळशीमंजिराचा अभिषेक कोणी शिरावर करत होते. खरोखरच बंकटलालचे भाग्य उदयास आले. त्या दिवशी सोमवार होता. इच्छाराम शेटजीच शेवटी राहिले होते. बंकटलालचे हे चुलत भाऊ. मनाने अतिशय भाविक व शंकराचे भक्त होते. मी महाराजांची यथासांग पूजा करतो. आज सोमवार आहे. प्रत्यक्ष शंकरच आज घरी अवतरले आहेत. इच्छारामांनी स्नान केले, तोपर्यंत सूर्यास्ताची वेळ झाली. प्रदोष वेळ साधून पूजासाहित्य घेऊन त्यांनी महाराजांचे अतिशय प्रेमाने पूजन केले आणि विनंती केली की, ''महाराज, आपण दुपारी जेवलात तरी आत्ता तुम्ही परत काहीतरी खावे. तुम्ही जेवल्याशिवल्याशिवाय मी नाही अन्न सेवन करणार. माझे सोमवारचे उपोषण (उपास) आहे. गुरुराया ! सर्व भक्तांचे तुम्ही लाड पुरवलेत आता तुम्ही माझा हट्ट पण पूर्ण करा.... तुम्ही भक्तावरी कृपा

करा!'' इच्छाराम परातीमध्ये नैवेद्य घेऊन आले. कुतूहलाने सर्व जण त्यांच्याकडे बघत होते. आंबेमोहोर तांदुळाच्या भाताच्या दोन मुदी होत्या. नानाविध अशा पक्वान्नांचा थाट होता. जिलबी होती, राघवदास मोतीचूर, करंज्या, अनारसे, घेवर असे वेगवेगळे प्रकार होते. त्यांचे वर्णन तरी काय करावे? भरपूर चटण्या-दही वाडग्यात भरून, वाटीभर तूप.... चार मनुष्य पोटभर जेवू शकतील असा नैवेद्य होता. महाराज नैवेद्य पाहून मनात म्हणाले, आज ह्या आग्रहाची खोड मोडायला हवी. भोजनाला सुरवात केल्यावर सर्व अन्न सेवन केले. मीठ लिंबू तेसुद्धा ठेवले नाही. महाराजांनी आवश्यकतेहून अधिक सेवन केल्यामुळे (आग्रह केल्याने) त्यांना खणाणून उलटी झाली. जे काही खाल्ले ते सर्व बाहेर आले. रामदासांच्या बाबतीत पण असे घडले होते. त्यांना खीर खायची इच्छा झाली. अशी इच्छा परत होऊ नये म्हणून आकंठ खीर प्यायले ते. वासनेला जिंकण्यासाठी उलटी झाली तरी परत खिरीचे सेवन करत होते. तसंच लोकांच्या आग्रहाला शीघ्र आळा घालण्यासाठी महाराजांनी अशी युक्ती केली. ते सर्व अन्न पचवण्याचे बळ त्यांच्यामध्ये होते. पण आपले आचरण कसे असावे हे पुढच्या पिढीला शिकवण्यासाठी महाराजांनी असे आचरण केले. आग्रह अति करू नये कारण तो विपरीत फळ देतो. उलटी झालेली जागा भक्तगणांनी स्वच्छ केली. परत स्नान घातले महाराजांना व त्यांच्या जागेवर नेऊन बसवले. नर-नारींनी महाराजांचे दर्शन घेतले. तिथे दोन दिंड्यासुद्धा भजन करण्यासाठी आल्या होत्या. गोड आवाजात सुरेल असे विठ्ठलाचे भजन ते गात होते. महाराज पण त्यांच्या जागेवरुन भजन स्वरुपात म्हणाले, ''गण गण गणांत बोतें'' हेच त्यांचे भजन. महाराज मुखातून सतत गण गण गणांत बोते असं सतत भजन म्हणायचे. म्हणूनच 'गजानन महाराज' असे लोक त्यांना संबोधू लागले. खरंतर ते ब्रह्मस्वरुप आहेत. त्यांना वेगळ्या नामाची काय आवश्यकता? नामाचा आश्रय तर शरीराला. आत्मा तर

ह्याहून वेगळा आहे. पंढरपुरात आषाढीला गोदावरी तीराशी, कुंभमेळ्यासाठी हरिद्वार येथे जशी गर्दी होते तशी गर्दी शेगावात व्हायला लागली. बंकटलालच्या घरी असंख्य भक्त लांबलांबून रोज दर्शन घ्यायला येत होते.

महाराजांची दिनचर्याही निश्चित नव्हती. कधी स्नान करायचे, कधी गढूळ जलाचे प्राशन करायचे. दिनचर्येचा असा नेम नव्हता. वायूच्या गतीने एका ठिकाणाहून दुसरीकडे जात होते. चिलिमीवर त्यांचे प्रेम होते. असाच भाव पुढील अध्यायात ठेवून महाराजांना वंदन करुन इथेच द्वितीय अध्याय पूर्ण होतो.



# श्रीगजानन विजय कथासार - अध्याय ३रा

श्रीगणेशाला वंदन करुन तृतीय अध्यायाला सुरुवात करुया.

महाराज तुमचा असाच आशीर्वाद आमच्या पाठीशी राहू दे. तुम्ही करुणेचा सागर आहात.

महाराजांचे दर्शन घेण्यासाठी दूरदूरवरुन भक्त मंडळी रोज बंकटलालच्या घरी येत होती. मध असतो तिथे मधमाश्या आपसूक येतातच. एकदा काय झाले, महाराज त्यांच्या आसनावर स्थिर बसले होते. सकाळची वेळ होती. सूर्यदेव उगवण्याची वेळ झालेली. झाडांवर पक्ष्यांचा किलबिलाट सुरू होता. कोंबडा आरवत होता. मंद अशी वाऱ्याची झुळूक वाहत होती. अशा त्या रम्य पहाटे एक साधू शेगावात दर्शनासाठी आले होते. अगदी साधा गोसावी होता तो. श्रीमंतांच्या गर्दीत तो कुठून दिसणार? भगवी चिंधी डोक्याला बांधली होती. उजव्या काखेत एक झोळी होती. कोपऱ्यात एकीकडे तो गोसावी बसला होता. गर्दी खूप होती. गोसाव्याला मनात वाटले, आता आपल्याला दर्शन मिळणार की नाही? तो तिथेच बसून मनापासून महाराजांचे चिंतन करू लागला. समर्थांचा नावलौकिक त्याने काशीमध्ये ऐकला होता. महाराजांना गांजा अर्पण करण्याचा नवस त्याने केला होता. त्याला वाटले की बहुतेक आपला हा हेतू आता पूर्ण होणार नाही. इथे गांजाचं नाव काढलं तरी लोक आपल्याला नावं ठेवतील. आपण तर गांजा नवस फेडण्यासाठीच शेगावी आलो आहोत. माझ्या नवसाची ती मात सांगू तरी कोणाप्रत? ज्याला जी वस्तू आवडते त्याचाच नवस तो सांगत असतो. त्यांचे मनोगत स्मरुन महाराज म्हणाले आणा तो काशीचा गोसावी इकडे, तो बघा त्या कोपऱ्यामध्ये दडून बसलाय. हे ऐकून त्या गोसाव्याला अतिशय आनंद जाला.

मनात म्हणाला, खरंच हे त्रिकालज्ञ संत आहेत. मी जे काही मनामध्ये चिंतले ते सर्व ह्यांनी जाणले. ज्ञानेश्वरीच्या सहाव्या अध्यायामध्ये कथा आहे की स्वर्गलोकीच्या गोष्टी योगीवरांना समजतात. त्याचा प्रत्यय आज मला इथे आला. धन्य आहेत साधुवर. लगेचच मंडळींनी गोसाव्याला महाराजांपुढे आणले. महाराज त्याला वदले, काढ तुझ्या झोळीतून. तीन महिने त्या झोळीत तू जी गोष्ट जपून ठेवलीस. हे ऐकताच गोसावी महाराजांपुढे गडाबडा लोळू लागला.

त्याने महाराजांना साष्टांग नमन केले. महाराज वदले, असा नवस केलास तेव्हा लाज नाही वाटली, मग तुला आता का लाज वाटतेय ? गोसावी महाधूर्त होता. महाराजांना म्हणाला, ''मी नवस फेडतो महाराज, पण ह्या गरिबाची अजून एक इच्छा पूर्ण कराल का ? माझ्या बुटीची आठवण कायम राहू दे तुम्हांला. भक्ताची इच्छा ज्ञाता पुरवीत असतो. अंजनी जी वानरी होती. तिने त्रिपुरारीची प्रार्थना करुन सांगितले की, तुम्ही माझ्या उदरी जन्म घ्या. माझे मनोरथ पूर्ण करा. अशीच माझ्या बुटीची आठवण तुम्ही ठेवा''. गोसाव्याने झोळीतून बुटी काढली. महाराजांना चिलिमीमध्ये घालून पाजली.

महाराज मनात किंचित घोटाळले. गोसाव्याला म्हणाले, आई आपुल्या लेकरांचे वेडे-वाकडे चाळे पण पुरवते. असा हा बुटीचा वृत्तांत.

अशी ही गांजाची प्रथा पडली. लक्षात ठेवा, व्यसनाधीनता नाही झाली महाराजांना. त्यांचा निर्धार होता खरा. महाराज कधी वेद म्हणायचे कधी वेगवेगळ्या रागांतून गाणे गायचे. महाराज कधी भजन म्हणायचे, कधी नुसते मौन पालन करायचे. कधी कोणाच्या घरी जाऊन बसायचे.... असा वेगवेगळा त्यांचा दिनक्रम असायचा.

त्या शेगावी एकदा असे झाले की, नामवंत असे जानराव देशमुख होते. त्यांचा प्राणान्त होण्याची वेळ जवळ आली होती. वैद्यांनी

अथक प्रयत्न केले होते. पण 'शक्ति' पार निघून गेली होती. तिळभर असे यश पण वैद्यांना मिळाले नव्हते. घोंगड्यावर त्यांना काढून ठेवा व सर्व आप्तांना कळवा असे वैद्यांनी सांगितले. तेव्हा काही आप्त म्हणाले, सर्व प्रयत्न केले पण आता एक शेवटचा प्रयत्न करुया ह्या बंकटलालच्या घरी एक संत आले आहेत, त्यांचा आशीर्वाद घेऊन बघूया. ते बंकटलालच्या घरी आले. बंकटलालला सर्व परिस्थिती त्यांनी वर्णन केली व म्हणाले ''महाराजांच्या चरणाचे तीर्थ द्या ना आम्हांला. माझ्यावर कृपा करा ही विनवणी करतो मी तुम्हांला''. बंकटलालने सर्व वडिलांना सांगितले. भवानीराम मनाने सज्जन होते. दुसऱ्याचे दुःख ऐकून ते विव्हळले. त्यांनी एका भांड्यामध्ये पाणी भरले, समर्थांच्या चरणांना लाविले आणि विनवून महाराजांना सांगितले की, जानरावांसाठी तीर्थ देतोय. महाराजांनी होकारार्थी मान डोलावली. जानरावांना ते तीर्थ पाजले. त्यांच्या घशाची घरघर बंद झाली. हात हलवू लागले. किंचित डोळा उघडू लागले. तीर्थाने त्यांना आराम पडू लागला. तीर्थाचा प्रभाव त्यांच्यावर झाला. त्या प्रकाराने सर्व नारी-नर आनंदित झाले. महाराजांचा अधिकार सगळ्यांना कळलेला. औषध हळूहळू बंद करुन सर्व भिस्त तीर्थावर ठेवली. त्या योगाने आरोग्यता जानरावांना प्राप्त झाली. आठ दिवसांतच जानराव पूर्वीप्रमाणे झाले. मग ते मुद्दाम भवानीरामांच्या घरी समर्थांच्या दर्शनासाठी आले. महाराज खरंच कलियुगातील मनुष्याचा खरा आधार आहेत. संत मृत्यू टाळत नसतात. निसर्गाच्या फेऱ्यामध्ये लुडबुड करत नाहीत. पण आगंतुक संकट असल्यास ते मार्गातून ते दूर करतात. मृत्यूचे ३ प्रकार आहेत. आध्यात्मिक, आधिभौतिक व आधिदैविक. आध्यात्मिक हा बलिष्ठ असतो. आधिभौतिक हा कुपथ्याने होतो. त्यातून व्याधी निर्माण होतो. त्याचा परिहार औषधाने करता येतो. मात्र औषधी देणारा शास्त्रज्ञ असला पाहिजे. आधिदैविक

नवसाने घालवता येतो. आध्यात्मिक मृत्यू कोणाच्या हातून टळत नाही. अर्जुनाचा बालक अभिमन्यू कृष्णासमक्ष असून त्याला मृत्यू आला. मनामध्ये श्रद्धा व विश्वास पूर्ण हवा. गजानन महाराज हे वेषधारी नव्हते. ते साक्षात्कारी होते. म्हणून तीर्थाने व्याधी बरी झाली. देशमुख बरे झाल्यावर त्यांनी बंकटलालच्या घरी भंडारा घातला. महाराजांनी मनात विचार केला आणि कडकपणा धरायला हवा असे ठरवले. त्यांचा कडकपणा इतरांना सहन झाला नाही. पण त्यांच्या भक्तांना त्याचे काही नाही वाटले. वाघिणीला सगळे घाबरतात, पण तिची पिल्लं तिच्याच कुशीत निर्धास्त झोपतात. कस्तुरीच्या शेजारी माती असते, तिला पण मोल प्राप्त होते. ज्या जमिनीत ऊस पिकतो त्याच जमिनीत निवडुंग आणि मोगरा पण वाढतो. एकाच स्थानात राहून त्यांची किंमत समान नसते. हिरा हा हिरा असतो. गारा ही गारा असते.

गजानन महाराजांच्या जवळ पण असाच एक होता. तो महाराजांची सेवा वरवर करायचा. भाव निराळे होते मनामध्यें समर्थांच्या नावावर मिठाई पेढे घ्यायचा. मोठेपणा मिरवायचा. इथली सगळी कामे माझ्याशिवाय होत नाहीत, असा त्याला गर्व झालेला. समर्थांची चिलीमपण मीच भरतो. मी त्यांच्या लाडका भक्त आहे, असे तो लोकांना सांगत असे. त्याचे नाव होते माळी विठोबा घाटोळ. महाराज स्वतः शंकर आणि हा नंदिकेश्वर बनला होता. येणाऱ्या भक्तांवर गुरगुर करायचा. समर्थांनी हे सर्व जाणले. परगावातील काही मंडळी शेगावात दर्शनाला आली होती. महाराज त्या वेळी निजले होते. महाराजांना उठवण्यासाठी कोणाची तयारी नव्हती. तिथल्या काही लोकांनी विठोबाला विनवले की तूच महाराजांना उठवू शकतोस. अशी त्यांनी स्तुती केल्यावर विठोबा मनात फुगून गेला. त्याने तत्क्षणी जाऊन महाराजांना उठवले. मंडळींचे काम झाले, पण घाटोळ

विठोबावरी संकट ओढवले. जसे कर्म तसे फळ त्याला मिळाले. समर्थांच्या हाती एक काठी होती, तीच त्यांनी त्याच्या पाठीत घातली आणि म्हणाले, हा बेटा माजून गेला आहे. त्याची परिस्थिती तो विसरून गेला आहे. भक्तीचा व्यापार त्याने आरंभिला आहे. काठीचे फटके मिळाल्यावर विठोबा पळाला तो पुनः परत आला नाही. मनापासून भक्ती करणारे असे नसतात. संत भूमीवर सर्वांचे रक्षण करण्यासाठी अवतार घेतात. नामस्मरणातच आयुष्य रममाण करावे.

अशा प्रकारे गजानन कथासाराचा तृतीय अध्याय समाप्त झाला.



# श्रीगजानन विजय कथासार - अध्याय ४था

श्रीगणेशाला वंदन करुन चौथ्या अध्यायाची सुरुवात करुया.

अनन्य भावाने भगवंताची भक्ती केली की, तो आपल्या भक्ताच्या पाठी उभा राहतोच. त्याच्या बुध्दीनुसार जो भगवंतावर दृढ श्रद्धा ठेवतो. तसा भगवंत त्यास पावतो. महाराज बंकटलालच्या घरी असताना एक प्रकार घडला. वैशाख शुद्ध पक्षातील अक्षयतृतीयेचा दिवस होता. (पितरांना उदककुंभात श्राद्ध घालायचे.) वऱ्हाडातील लोकांसाठी हा मोठा सण होता. विशेष दिवस मानायचे. त्या दिवशी काय झाले ते ऐका, महाराज मुलांमध्ये बसले होते. मुलांना कौतुक वाटत होते. बालकांना महाराज म्हणाले, चिलीम मला भरून द्या. सकाळपासून असाच बसलोय. चिलीम मुळीच नाही प्यायलो. असं ऐकताच मुलं आनंदली. चिलीम भरू लागली. विस्तवाचा (अग्नीचा) तपास मुलं करत होती. चूल पेटवण्यासाठी अवकाश होता. म्हणून मुलांना चिलीम पेटवण्यासाठी विस्तव कुठे मिळाला नाही. मुलं विचार करत होती. मुलांना चिंतातुर बघून बंकटलालने त्यांना सांगितले, अरे, मुलांनोतो जानकीराम सोनार आहे ना, त्याच्याकडे तुम्हाला विस्तव नक्की मिळेल. मुलांनी ते ऐकलं व ती जानकीराम सोनाराकडे आली आणि त्याच्याकडे विस्तव मागू लागली समर्थांची चिलीम भरण्यासाठी. जानकीराम मुलांवर रागावला. मुलांना म्हणाला, आज अक्षयतृतीयेचा सण आहे. त्यामुळे आज मी कोणाला विस्तव देणार नाही. मुलांनी जानकीरामासमोर हात जोडले व विनंती करून म्हणाली, अहो असा अविचार नका करू. देवांचेही देव महाराज आहेत. त्यांच्या चिलिमीसाठी हा विस्तव हवा आहे. साधूंना काही द्यायची संधी मिळणे हे अशुभ नसते. आम्ही लहान असून आम्हांला कळतय पण तू मोठा असून तुला कसे कळत नाही ? विस्तव तू दिलास

तर तुझ्या घरी भाग्य येईल. ''सोनाराचं विनाशकाले विपरीत बुद्धी तसं झालेलं. तो गर्वाने म्हणाला'', तो कसा काय पुण्यवान? नागवा फिरतो. तंबाखू खातो. जात गोत्र काही त्याचं माहीत नाही. अशा वेड्यापिशाला मी विस्तव देत नाही. साक्षात्कारी आहेत ना ते? मग कशाला विस्तव हवा त्याला? स्वकर्तृत्वाने का तो विस्तव निर्माण करत नाही? साधु नाथजाल पण चिलीम प्यायचे. पण त्यांनी नाही मागितला विस्तव.

बंकटलाल पण खुळा झालाय. जा जा, इथे थांबू नका. इथे तुम्हाला अजिबात विस्तव मिळणार नाही. मुलं मनातून निराश झाली तशीच विन्मुख परतली. परतल्यावर मुलांनी जे काही झाले ते सर्व वर्णन महाराजांना केले. ते ऐकल्यावर महाराजांनी स्मितहास्य केले व बंकटलालला म्हणाले , अरे एक काडी जरा धर या चिलिमीवर... बंकटलाल म्हणाला, गुरुराया, थोडे थांबा, आत्ता काडी घासून विस्तव निर्माण करून देतो. काडी घासल्याशिवाय अग्नी कसा येईल? महाराज त्याला म्हणाले, उगीच चरचर करु नकोस. काडी वर धरायला सांगितली आहे ना तेवढी धर. समर्थाची आज्ञा प्रमाण मानून बंकटलालने तसे केले. श्रोत्यांनो, ऐका काय झालं, बंकटाने तसे करताच त्या काडीच्या इथे अग्नी प्रज्वलित झाला. पुनः एकदा संताच्या प्रभावाची प्रचिती आली. आता ऐका, सोनाराच्या घरी काय झालं ते अक्षयतृतीया हा विशेष सण आणि चिंचवण्याला विशेष मान. पंगत भोजनाला बसली. चिंचवणी द्रोण्यात वाढली तर अघटित घडला. चिंचवण्यामध्ये अळ्या होत्या. लोकांना बघूनच किळस आली. लोक पत्रावळ्यांवरून उठले. सोनाराला काही कळेना असं का झालं. मग त्याच्या लक्षात आलं की, आपण महाराजांना चिलिमीसाठी विस्तव दिला नाही म्हणून असं झालं. महाराजांचा अधिकार त्याला कळून चुकला. मनामध्ये त्याला त्याची लाज वाटली. तो त्वरित

बंकटलालाच्या घरी गेला व बंकटलालला म्हणाला ''अहो घात झाला. चिंचवण्यामध्ये किडे पडलेत बघा. सकाळी मुलं आलेली तेव्हा मी त्यांना विस्तव नाही दिला ना. त्याचेच हे फळ''. बंकटलाल त्याला म्हणाला की, चिंचोके किडके असतील नीट बघ. तेव्हा जानकीराम सोनार म्हणाला की, मी स्वतः चिंच फोडली. अजून तिची टरफले आहेत. मला महाराजांची माफी मागायची आहे. मला साष्टांग दंडवत त्यांना घालायचाय. मला त्यांच्याजवळ घेऊन चला. महाराज दिसताच त्याने त्यांच्या पायाशी लोटांगण घातले. महाराज, मला क्षमा करा, मला तुमचा अधिकार कळला नाही. माझे अपराध गवताप्रमाणे आहेत ते तुम्ही तुमच्या कृपाआशीर्वादाने जाळून टाका. आता मी टवाळी नाही करणार. आजची शिक्षाच माझ्यासाठी पुरे झाली, तुम्ही अनाथांचे नाथ आहात. आता अंत नका पाहू. महाराज, त्यावर त्याला म्हणाले, मी तिळभर खोटे बोलणार नाही. तुझी चिंचवणी आहे मधुर, अजिबात अळ्या नाही त्यात. लोकांनी जाऊन चिंचवणी बघितली तर त्यात अजिबात अळ्या नव्हत्या. सर्वांना समर्थांचे महत्त्व कळले.

शेगावात चंदुमुकीना नावाचे एक गृहस्थ राहायचे. महाराजांचे अगदी निस्सीम भक्त. ज्येष्ठ मास चालू होता. सगळे भक्त समर्थांच्या सभोवार बसले होते. कोणी आंबे कापत होते, कोणी पंख्याने वारा घालत होते, कोणी खडीसाखर वाटत होते, कोणी महाराजांच्या गळ्यात हार घालत होते. हातांना थंडगार चंदन लावत होते. त्या वेळी महाराज चंदूला म्हणाले, ''हे आंबे नको मला. दोन कान्होले उतरंडीला आहेत तुझ्या ते मला खायला घेऊन ये. वेळ नको घालवूस. कारण नको देऊस''. चंदू हात जोडून म्हणाला, महाराज, अहो आता कुठून आणू कान्होले ? महाराजांनी सांगितले, जा वेळ करू नकोस, गुरूला खोटं सांगू नकोस. सगळ्यांनी चंदूला समजावले की तू घरी जाऊन बघ. संतवाणी खोटी नाही होणार. चंदू घरी गेला. आपल्या

पत्नीला विचारू लागला, २ कान्होले आहेत का गं उतरंडीला? ऐक महिन्यापूर्वी केलेले हो आता कोठून असतील इथे कान्होले? अक्षयतृतीयेला केलेले ना. तुम्हांला हवे असले तर नवीन करुन देते. समर्थांसाठी लगेच तळून देते. ही बघा कढई ठेवते मी लगेच. चंदू म्हणाला, अगं महाराजांना ताजे नकोत. उतरंडीवर ठेवलेले आहेत तेच हवेत. बायकोने त्याच्या मनात विचार केला. मग तिला काहीतरी आठवलं. म्हणाली, थांबा नाथ, महाराज सत्य सांगत आहेत. २ कान्होले मी उतरंडीस महिन्यांपूर्वी ठेवले होते. पण आता मात्र त्यांना बुरशी लागली असेल. खाण्यायोग्य नसतील राहिले. उतरंडी सर्व शोधल्यावर कळशी होती खापराची त्यात बरोबर दोन कान्होले मिळाले. पण त्यांना बुरशी आली नव्हती, फक्त थोडे सुकून गेलेले. कान्होले बघून दोघांनाही अत्यानंद झाला. रामाने जशी शबरीच्या बोरांची सेवा स्वीकारली होती त्याचीच आठवण इथे झाली.

शेगावच्या दक्षिणेला चिंचोवली गाव होते. तिथे माधव नावाचा एक गृहस्थ होता. वय साठीहून अधिक होते. तरुणपणी संसार हे त्याचे ब्रम्ह होते. आता त्याचे अवयव क्षीण झालेले. ब्रम्हदेवाने जे भाग्यात लिहिले आहे शेवटी तेच होत असते. माधवास कोणी उरले नव्हते. म्हणून त्याचे मन विरक्त झाले होते. त्याने भगवंताला प्रार्थना केली की हे प्रभू दीनदयाळा, आता मला तुमच्याशिवाय कोण आहे? असं मनात ठरवून तो शेगावी आला. आल्यावर त्याने उपोषण आरंभ केले. अन्न, पाणी सर्व त्यागले व मनातून सतत नारायण नारायण जप करत होता. एकही दिवसाचा खंड नाही पडला. महाराज त्याला म्हणाले, हे करणं योग्य नाही. हेच हरीचे नामस्मरण आधी का नाही केलेस? वेळ गेल्यावर केलेल्या साधनेचा काय उपयोग? ज्या मुलाबाळांसाठी तू जे काही केलेस ते शेवटी तुला टाकून गेले. अशाश्वताचे पोषण तू केलेस. त्या कर्माची फळे तुला भोगणे भाग

आहे. ती फळे भोगल्याशिवाय तुझी सुटका होणार नाही. टाकून दे हा हट्टीपणा. शेगावचे जे कुलकर्णी होते त्यांनीसुद्धा विनवणी केली, की घरी भोजनास चला अन्नाशिवाय राहू नका. पण माधवाला ते पटले नाही. तसाच समर्थांच्या सान्निध्याला बसला नाम हरीचे घेत. रात्रीचे दोन वाजले असतील. सगळीकडे काळोख होता. रातकिड्यांचा आवाज येत होता. जवळपास कोणी नाही हे पाहून गजानन महाराजांनी भयंकर रुप धारण केले व माधवावर धावून गेले. तसा माधव पळाला आपला जीव वाचवायला. त्याच्या चित्ताला धडकी भरली. तोंडातून शब्द फुटेना. मग अशी माधवाची स्थिती पाहून महाराजांनी सौम्य रुप धारण केले, म्हणाले हेच का तुझे धीटपण, पुढच्या स्थितीची जाणीव झाली माधवाला. तो म्हणाला, यमलोकाची वार्ता नको समर्थ आता, तिथे जे होते त्याच रुप तुम्ही दाखवले. जरी असतील माझ्या पापांच्या राशी तरी त्या जाळणं तुमच्यासाठी अशक्य नाही. महाराज म्हणाले, माधवा आता तुझे मरण जवळ आले आहे. तुला जगण्याची इच्छा असेल तर मला सांग, तुझे आयुष्य वाढवतो. माधव म्हणाला, नको महाराज, आता जन्म मृत्यूच्या फेऱ्यात मला गुंगवू नका. तथास्तु असं महाराज वदले. असा दोघांमध्ये गुप्त स्वरुपाचा संवाद झाला. माधवाचा नामाचा ध्यास पूर्ण झाला. समर्थांच्या सन्निध त्याचे देहावसान झाले. एके दिवशी समर्थांनी शिष्यांना सांगितले, वैदिक ब्राम्हण बोलवा. इथे मंत्रजागर करा. वेदश्रवणाने भगवंताला आनंद मिळतो. पन्हे, पेढे, बर्फी, भिजलेल्या डाळीला मीठ लावून ब्राम्हणांना एक-एक रुपया दान द्या. शिष्य महाराजांना विनवू लागले की, महाराज इथे आता शेगावात वैदिक ब्राम्हण नाही राहिले. महाराज म्हणाले, त्यांची चिंता तुम्ही नका करु. उद्या वसंतपंचमी आहे, तुम्ही तयारी करा. श्रीहरी ब्राम्हण धाडेल. मग काय विचारता, सगळ्यांनी खूप उत्साहाने तयारी केली. १०० रुपये

जमले. सर्व सामान आणले. चंदनाचे उटणे केले. केशर कालविले. दुपारी दोन वाजता ब्राम्हण आले शेगावी. थाटात वसंतपूजा पूर्ण झाली. ब्राम्हण मंडळी आनंदित झाली. संताच्या मनात जे येते ते परमेश्वर पूर्ण करतोच. अशा प्रकारे गजानन विजय कथासाराचा चतुर्थ अध्याय पूर्ण झाला.



महाराज, मी आहे तुमचा भक्त. तुमच्या प्रेरणेनेच सुचे शब्द. सर्व लेकरे मातेसाठी समान असतात. तसेच सर्व भक्त हे तुमच्यासाठी सारखेच आहेत. शेगावी महाराजांच्या दर्शनासाठी रोज वेगळी यात्रा येत असे. सर्व ठिकाणी महाराजांची महती पसरली होती.

महाराज एकदा पिंपळ गावाला गेले. तिथे अशी एक गोष्ट झाली. पिंपळ गावाच्या शिवारात एक शंकराचे मंदिर होते. पद्मासन घालून महाराज शंकराच्या गाभाऱ्यात बसले

त्या गावचे गुराखी आपल्या गुरांना घेऊन त्यांच्या घरी जात होते. शंकराच्या मंदिराच्यापुढे एक ओढा होता. आपल्या गुरांना पाणी देण्यासाठी गुराखी तिथे गेले. एक गुराखी शंकराला नमस्कार करण्यासाठी मंदिरात गेला, तेव्हा महाराजांना तिथे ध्यानस्थ बघून त्याला आश्चर्य वाटले. सूर्यास्ताच्या वेळेला आजपर्यंत कुणाला इथे मंदिरात पाहिले नव्हते, मग हे सत्पुरुष कोण आहेत ? पण हे डोळे का उघडत नाहीत ? असे अनेक प्रश्न त्या गुराख्यांना पडले होते. कोणी म्हणाले, उपाशी असतील ते, खूप थकले असतील. आपण आपल्यातली भाकरी त्यांना देऊया असे त्यांनी ठरवले. गुराखी एकमेकांशी असा संवाद करत होते. परंतु समोर बसलेला साधू हलत नाही, काही बोलत नाही ह्याचं त्यांना नवल वाटत होतं. अंग गार नाही पडलंय साधूचं ह्या, ह्यावरून हा जिवंत नर आहे ह्यात शंका घेऊ नका असे एका गुराख्याने सांगितले. कोणी म्हणाले हे भूत पिशाच नाही ना, जे मायावी रुप दाखवत आहे. एका गुराख्याने त्यांचे समाधान केले. त्यानं सांगितले अरे हे शंकराचे मंदिर आहे. इथे भूत नाही येणार कधी. प्रत्येकाचे मत वेगळे होते. काही म्हणाले की हा तर स्वर्गातील

देव वाटतो. आपण ह्याच्या दर्शनाचा लाभ घेऊ या. आपण ह्यांची पूजा करुया, असे त्यांनी ठरवले. स्नानासाठी ओढ्यावर मुलांनी पाणी आणले. परमभाव ठेवून समर्थांच्या पायांवर घालत होते. कोणी वनामधून पुष्पे आणली. त्याचा हार करुन समर्थांच्या गळ्यात घातला. नैवेद्यासाठी कांदाभाकरी आणली वडाच्या पानावर. गुराख्यांनी महाराजांना नमन केले व त्यांच्यापुढे भजन केले. अगदी आनंदात रममाण झालेले ते सगळे. दिवस मावळून गेलेला. घरचे शोधायला येतील म्हणून वेळेवर गुराखी घरी जायला निघाले. घरी जाऊन गावातील वडीलधाऱ्या व्यक्तींना आपण ही घडलेली हकिकत सांगूया असे त्यांनी ठरविले. सर्व हकिकत गुराख्यांनी घरी जाऊन वडिलधाऱ्यांना सांगितली.

दुसऱ्या दिवशी सकाळी गावची सर्व मंडळी समर्थांना पाहण्यासाठी शिवाच्या मंदिरात आली. येऊन सगळे बघतात तर महाराज जसे काल ध्यानस्थ होते तसेच बसले होते. भाकरीला स्पर्श केला नव्हता. ते बघून सगळे म्हणाले, नक्कीच हे योगी पुरुष आहेत. साक्षात 'शिव'च पिंडीच्या बाहेर आले आहेत. आपण त्यांना त्रास नको देऊया. त्यांना ध्यानस्थ बसू दे. आपण गावात नेऊया त्यांना. म्हणून त्यांनी एक पालखी आणली. त्यात महाराजांना स्थानापन्न केले व सुंदर अशी पालखी यात्रा सुरू झाली. गावातील स्त्री-पुरुष झांजांच्या गजरात जयघोषात मिरवणूक सज्ज करत होते. मुलं तुळस, फुलं, गुलाल असं आनंदानं मधे-मधे उडवत होती. समर्थांचे संपूर्ण शरीर गुलालामुळे लाल झाले होते. भजन स्तवनाने वातावरण प्रसन्न झाले होते. जय जय योगिराजमूर्ती असा जयघोष सुरु होता. मिरवणूक गावात आल्यावर मारुतीच्या मंदिरात समर्थांना आणून बसविले एका भव्य पाटावर. तो दिवस पण तसाच मावळून गेला. सर्व जण समर्थांच्या काळजीत होते. म्हणून त्या सर्वांनी ठरविले की आपण उपाशी बसून

स्तवन करुया त्यांच्यापुढे. असा विचार ते करत होते की, सद्‌गुरु श्रीगजानन जे साक्षात मुकुटमणी योग्यांचे ते देहरुपात आले. मग काय विचारु नका. सर्वांना खूप आनंद झाला. सर्वजण समर्थांच्या पायावर आपले डोके ठेवून नमस्कार करत होते. नैवेद्याची तयारी झाली. पानांची पंगत मारुतीच्या मंदिरात मांडली गेली. त्या सर्वांचा स्वीकार समर्थांनी केला (थोडं त्यातील सेवन केलं) सगळीकडे वाऱ्यासारखी ही बातमी पसरली. दुसऱ्या मंगळवारी पिंपळगावाचे गावकरी काही कारणानिमित्त शेगावी आले होते. ते सहज शेगावच्या लोकांना म्हणाले, आमच्याही पिंपळगावात एक थोर अवलिया आले आहेत. ज्यांच्या स्पर्शाने आमची पिंपळगाव नगरी धन्य झाली आहे. आम्ही आता त्यांना कुठेही जाऊ देणार नाही. असेच त्यांच्या भक्तीत रममाण होणार.

बंकटलालला हे सर्व समजल्यावर तो पत्नीसह दर्शनासाठी पिंपळगावी गेला. तिथे गेल्यावर हात जोडून त्यांनी समर्थांना विनंती केली, महाराज, आत्ता येतो असं सांगून गेलात, पंधरा दिवस झाले ह्याला, गुरुराया तुमच्याशिवाय घर भणभणीत वाटते. स्वामी तुमच्याशिवाय शेगावचे सर्व जन चिंतातुर झाले आहेत. तुम्हांला नेण्यासाठी गाडी आणली आहे. महाराज, आई आणि बालकाची अशी ताटातूट नका हो करू. तुम्ही आला नाहीत तर मी ह्या शरीराचा त्याग करेन. महाराज, चला ना आमच्याबरोबर. बंकटलालाचे बोल ऐकुन महाराज गाडीत बसले. जसा गोकूळवासीयांना कृष्णाला मथूरेला नेताना अक्रूर भासला तसाच बंकटलाल पिंपळगाववासीयांना वाटला. बंकटलाल पिंपळगावच्या गावकऱ्यांना समजावत होता की वाईट वाटून घेऊ नका, समर्थ कुठे लांब जातायत? जेव्हा दर्शन घ्यायचं असेल तेव्हा शेगावी येत जा. महाराज बंकटलालला गाडीत बसल्यावर म्हणाले, दुसऱ्याची वस्तू बळे न्यायची का अशी? बंकटा मला तुझ्या

घरी भय वाटते. तुझ्या घरची रीत बरी नाही हे मी पाहतो. लक्ष्मी जी लोकमाता आहे व विष्णुपत्नी आहे. तिची महासत्ता आहे तुझ्या घरात. तिला पण तुम्ही घरात कोंडले तिथे माझी काय गत? म्हणून पळून गेलो. जगदंबेचे असे हाल पाहून माझे मन घाबरले. असे वर्णन ऐकून बंकटलालला खुदकन हसू आले. विनम्रतेने महाराजांना म्हणाला, गुरुनाथ अहो माझ्या कुलुपाला माता घाबरली नाही अजिबात. उलट तुमचा वास तिथे होता म्हणून ती स्थिर झाली आहे. जिथे माता तिथेच बालक. तुमच्या चरणांपुढे गुरुनाथ मला धनाची किंमत नाही हो. तुम्हीच माझे खरे धन. म्हणून तर आलो इथवर. घरमालकाला शिपाई अडवू शकतो का सांगा? तुमची जशी इच्छा होईल तसेच वागा. पण माझी एवढीच विनंती आहे तुम्हांला की शेगाव सोडून कुठे जाऊ नका. अशी समजूत काढून बंकटने महाराजांना गावी परत आणले. सर्व जगाचा उद्धार करा, पण आम्हाला विसरु नका. असे बंकटलालने महाराजांना विनवले. काही दिवस राहून महाराजांनी परत भ्रमण केले, आता ती कथा ऐका, वऱ्हाड प्रांतात अडगाव नामक एक गाव होते. सकाळी सर्वांची नजर चुकवून महाराज अडगावी जाण्यासाठी निघाले. महाराजांची चालगती ही वायुसमान होती.

वैशाखाचा मास होता. तेव्हा काय घडले वर्तमान, समर्थांना तहान लागली. चौफेर त्यांनी बघितले तर कुठेच पाणी नव्हतं. अंगावरुन घामाच्या धारा, घसा सुकला अशी जलाविण समर्थांची परिस्थिती झाली होती. अशा ह्या दुपारच्या वेळी भास्कर नावाचा शेतकरी आपल्या शेतात काम करत होता. शेतकरी हा अन्नदाता आहे. उन्हामध्ये काम करुन बी पेरणे हे खूप मोठे कार्य शेतकरी करत असतो. अकोल्याला जलाचे एवढे दुर्भिक्ष आहे की एक वेळ घरात तूप मिळेल, पण पाणी मिळणार नाही. शेतामध्ये येताना घरुन भास्कराने एक कळशीभरुन पाणी आणले होते आणि वृक्षाच्या सावलीत त्याने ती

कळशी ठेवली होती. समर्थ त्या ठिकाणाहून पुढे जात होते. समर्थ भास्कराला म्हणाले, मला खूप तहान लागली आहे, तुझ्या कळशीतून पाणी दे ना जरा प्यायला. खूप तहान लागली आहे रे. पाणी देणं हे पुण्याचं काम आहे. म्हणूनच पाण्याला जीवन म्हणतात. भुकेल्याला अन्न व तहानलेल्याला पाणी द्यावे असे आपले संस्कार आहेत ना. भास्कर महाराजांना म्हणाला, ''अरे तू तर नंगा धूत दिगंबर. अशा दांडग्याला मी नाही देत पाणी. शास्त्रामध्ये पण असे वचन आहे की मदोन्मत्त व्यक्तीला पाणी देणं हे पाप आहे. मी माझ्या घराहून डोक्यावर उचलून घागर आणली आहे. त्या आयत्या पिठावर तू पोळी नको भाजूस. मला उगीच विनवणी करू नकोस. तुझं काळं तोंड इथून घेऊन जा चांडाळा. तुझ्यासारखे निरुद्योगी जन्मले जागोजागी म्हणून आम्ही अभागी झालो आहोत''. समर्थांनी फक्त हास्यवदन केले. तिथेच थोड्या अंतरावर समर्थांना एक विहीर दिसली. त्या दिशेने समर्थ जाऊ लागले. ते बघून भास्कर मोठ्याने ओरडून स्वामींना म्हणाला, ''अरे वेड्या, तिथे का जातो आहेस ? ती कोरडी ठणठणीत विहीर आहे''. समर्थ फक्त बोलले की, हे सत्य जरी की त्या विहिरीत पाणी नाही, पण मी प्रयत्न करतो, तुझ्यासारखे बुद्धिमान जलाने हैराण होतात हे मी माझ्या डोळ्यांनी आत्ता बघितले तरी मी स्वस्थ बसावे हे मला शक्य नाही. हेतू माझा शुद्ध आहे. समाजहितासाठी आपण कार्य करायला हवे. महाराज विहिरीपाशी आले. त्यात जलाचा एक थेंब पण नव्हता. हताश होऊन ते एका वृक्षाजवळ बसले. डोळे मिटून ध्यान केले. नारायणास नेत्रांसमोर स्थापन केले. म्हणाले, समर्थ वामना, वासुदेवा, प्रद्युम्ना, राघवा, देवा ही अकोला नगरी पाण्यावाचून त्रस्त झाली आहे, कुठेही ओलं नाही राहिली. मानवी प्रयत्न हरले. म्हणून आज मी तुला प्रार्थितो आहे. प्रल्हादाचा उद्धार करण्यासाठी स्तंभामध्ये प्रकटलास, करंगळीवर गोवर्धन पर्वत

धारण करून गोकुळवासीयांचे रक्षण केलेस, दामाजीपंतासाठी झालास महार, नामदेवाची भक्तीची तहान भागवलीस तशी आज ईश्वरा, ह्या अकोलावासीयांची तहान भागव. महाराजांनी अशी आर्त विनवणी करताच अहो आश्चर्यम त्या विहिरीला पाझर फुटला. विहीर क्षणामध्ये पूर्ण भरली. जगन्नाथाची साथ असता काय अशक्य? तेच जल प्राशन करुन समर्थ तृप्त झाले.

भास्कर दुरुनच हा सर्व प्रकार बघत होता. ते बघून त्याचे मन घोटाळले. गेली १२ वर्षे ही विहीर कोरडी ठणठणीत आहे आणि ह्याने एका घटकेत जलमयी केली. खरंच हा कोणीतरी योगी साक्षात्कारी आहे हे भास्कराला उमजले. शेतीचं काम सोडून भास्कर आला धावत. समर्थांना साष्टांग नमन केले. म्हणाला, ''मी तुम्हांला नको नको ते बोललो. तुमच्या बाह्यरुपाला बघून मी फसलो, तुम्ही विहिरीला पाणी आणून त्याचे निरसन केलेत. हेच तर देवपण. तुमचा अधिकार मला कळला आहे. आता मी तुम्हांला अंतर देणार नाही. मातेशिवाय बालक राहू शकेल काय?''

समर्थ भास्कराला म्हणाले, ''अरे आता मनात असे दुःख करु नकोस. आता एवढ्या दूरवरून तुला घागर किंवा कळशी घेऊन यायला नको. आता तुला काही कमी पडणार नाही मग का प्रपंच सोडतोस?'' भास्कर म्हणाला, ''महाराज अहो माझ्या हृदयात आज भक्तीचा पाझर फुटला आहे. पण माझा पण आता निश्चय पक्का आहे, आता मी भक्तीचा मळा फुलवणार आहे. सत्कर्माची झाडे लावेन आता. आता तुम्हीच माझी माऊली''.

बघा श्रोते हो, खऱ्या संताची क्षणभर साथ मिळाली तरी आयुष्यभराचा उद्धार होतो. ठिकठिकाणी कोरड्या विहिरीला पाणी लागल्याची वार्ता पसरली. अनेक ठिकाणांहून भक्त समर्थांच्या

दर्शनासाठी येत होते. विहिरीतील निर्मळ असे जल सेवन करून सर्व भक्त समर्थांच्या नामाचा जयघोष करत होते. पुढे भास्करासह अडगावी परत न जाता महाराज शेगावी परत आले. अशाप्रकारे गजानन विजय ग्रंथ कथासाराचा पंचमोध्याय समाप्त झाला.



गजानना, तुझी आमच्यावर अशीच कृपा असू दे. या बालकावर कधी रागावू नकोस. तुझ्या छत्रछायेमध्येच आम्हांला सुखी ठेव.

बंकटलालच्या घरी महाराज जेव्हा काही दिवसांसाठी राहत होते, तेव्हा अपूर्व अशी घटना घडली, ऐका हं. गावाच्या दक्षिणेस, बंकटलालचा मळा होता. तेथे महाराज एक दिवस कणसे खायला गेले, मक्याची. खूप मंडळी होती बरोबर. विहिरिजवळ त्यांनी लाकडांची शेकोटी पेटवून कणसे भाजण्यासाठी तयारी केली होती. त्या विहिरीजवळ एक गर्द छायेचा असा चिंचेचा वृक्ष होता. जशा अग्नीच्या ज्वाला प्रज्वलित झाल्या तसा त्यांतून धूर निघायला लागला. त्या चिंचेच्या वृक्षाला एक मधमाश्यांचे पोळे होते. जसा धूर ह्या पोळ्याला लागला तशा माशा त्यातून भराभर बाहेर निघाल्या. मधमाश्यांना बघून लोकांची तारांबळ उडाली. घोंगड्या पांघरुन लोक इकडून तिकडे सैरावैरा धावायला लागले. महाराज मात्र स्वस्थपणे त्यांच्या जागी बसून होते. त्यांनी त्यांच स्थान अजिबात सोडलं नव्हतं. मनात महाराज विचार करत होते, माशी मीच झालो, मोहोळ पण मीच झालो, कणीस खायला पण मीच आलो, कणीस हेसुद्धा माझेच रुप ना, ह्याच विचारात महाराज रमून गेलेले. महाराजांच्या अंगावर असंख्य माशा बसलेल्या, कल्पनासुद्धा करता येणार नाही महाराजांना किती वेदना झाल्या असतील. पण त्यांनी त्याची पर्वा केली नाही. शरीरावर असंख्य काटे बोचले होते. या गोष्टीला १ प्रहर झाला. सर्व भक्त चिंतातुर झाले. बंकटलाल हा महाराजांचा सच्चा भक्त होता. त्याला अस वाटायला लागले की मला कुठून ही बुद्धी झाली व मी महाराजांना इथे घेऊन आलो. कुठून मला ही कणीस खायला घेऊन यायची दुर्बुद्धी झाली. मीच महाराजांच्या दुःखाचे कारण झालो. हेच

काय माझे शिष्यपण ? हे काय माझे दुर्दैव. बंकटलालने मनात ठरवले की आता आपण पुढे होऊया. महाराजांना हे सर्व समजलं महाराजांना मनातून आनंद झाला. मनातल्या मनात त्यांनी बंकटलालचे कौतुक केले. जमलेल्या सगळ्या मंडळीत बंकट हाच माझा निस्सीम भक्त आहे. महाराज मधमाश्यांना उद्देशून म्हणाले, जीवांनो ! जा, निघून जाऊन तुमच्या पोळ्यात बसा. माझा बंकट माझ्यासाठी पुढे येतोय इथे, त्याला कोणीही चावू नका. असं महाराजांनी सांगताच मधमाशा जाऊन मोहोळावर बसल्या. बंकटलालने हे सर्व स्वतःच्या दृष्टिने पाहिले.

महाराज बंकटलालाकडे हसून बघत म्हणाले, बंकटा छान दिलीस रे आम्हांला मेजवानी, मधमाश्यांची. ते विषारी जीव माझ्या अंगावर बसताच लड्डू भक्त लगेच दूर गेले निघून. बघ हा विचार मनात कायम पक्का ठेव की, संकट आल्यावर ईश्वरावाचून कोणीही धावून येत नाही. जिलबी पेढ्यासाठी जे भक्ती करतात, असे स्वार्थी भक्त संकट आल्यावर निघून जातात. हे कायम लक्षात ठेव. बंकटलाला मधुरपणे महाराजांना म्हणाला, ''गुरुराया खूप वेदना होत असतील ना तुम्हांला, सोनाराला घेऊन येऊ का हो ? कितीतरी माश्या डसल्या असतील. किती अगणित गांधी उठल्या आहेत तुमच्या अंगावर. मला हे सगळं बघूनसुद्धा वेदना होतायंत महाराज, खरंच मी महापापी आहे हो, ह्याच्या परिहाराचा उपाय सांगा ना महाराज'', बंकटलालचे बोलणे महाराजांनी ऐकले, व महाराज म्हणाले, ''अरे एवढं काही नाही झालंय रे, डसणं हा स्वभाव आहे माश्यांचा. त्याचा मला अजिबात त्रास होणार नाही. सच्चिदानंद हेसुद्धा माशीचे रुप. तोच आहे माझा पुतळा. पाण्यानेच पाण्याला दुखवता येईल का सांग बघू''. हे ब्रम्हज्ञान ऐकल्यावर बंकटलाल शांत झाला. सोनार काटे काढण्यासाठी तो घेऊन आला. पण सुक्ष्म काटे इतके की सोनारांना थोडेच ते दिसणार होते.

महाराज म्हणाले, मीच ह्याचा प्रत्यय दाखवतो. असे महाराजांनी म्हटले आणि रुतलेल्या जागांमधून काटे आपोआप वरती आले. तो प्रकार पाहताच लोक खूप आनंदले. सर्वांना महाराजांचा अधिकार कळून आला. लोकांनी परत कणसे भाजली व सर्वांनी ती आनंदाने ग्रहण केली. त्यानंतर महाराज आपले भाऊ नरसिंगजी यांना भेटण्यासाठी अकोटाला गेले. नरसिंगजी विठ्ठलाचे भक्त होते. अकोट हे नगर शेगाव पासून १८ कोसांवर आहे. अकोटच्या जवळ एक निबिड असे अरण्य आहे. तिथे एकांतवासात नरसिंग जी राहायचे. निर्जन, महाभयंकर दारुण असे ते जंगल अरण्य होते. पाणीच पाण्याला जाऊन मिळते. विजातीय द्रव्याशी समरसता होत नसते. असंच बंधुप्रेम असते. महाराजांना बघून नरसिंगजींना खूप आनंद झाला. त्या आनंदाचे वर्णन शब्दात कसे करु. एक हरी एक हर चालते बोलते दोघे परमेश्वर. एक राम एक कृष्ण अशी किती उदाहरणं देऊ. दोघांना खूप आनंद झाला. महाराज नरसिंगजींना म्हणाले की, तू प्रपंचामधे राहिलास, चांगलं केलंस. मी त्या सर्वांचा त्याग करुन योगाचा स्वीकार केला आहे आणि सच्चिदानंद तत्त्व स्वीकारले आहे. शास्त्रामध्ये कर्म, भक्ती आणि योग असे ३ मार्ग सांगितले आहेत. फल ह्या तीनही मार्गांचे अखेरीस एकच आहे. फक्त त्याचे बाह्य स्वरुप वेगळे आहे. प्रपंच, योग किंवा कर्मसाधना ह्यांपैकी कोणत्याही मार्गावर चालताना मनातून सतत भगवंताचे चिंतन करायला हवे म्हणजे काही अशक्य नाही. नरसिंगजी म्हणाले, बंधुराया ! मला भेटायला आलास, केवढी ही दया आहे तुझ्या हृदयात. ह्याला मी कोणती उपमा देऊ. प्रपंच हा मुळी अशाश्वत असतो. त्याची काय किंमत दुपारच्या सावलीप्रत. तू जसे वर्णन केलेस तसेच मी भूवरी वागेन. हीच माझ्याकडून भेट तुला. देह हे प्रारब्ध ज्याचे असेल, त्या जातीचे ते व्हायचे आहे निःसंशय. त्यासाठीच तर भगवंताने आपल्याला

भूवरी धाडले आहे. आता तुला फक्त एक विनंती करतो की, अशी व्यावहारिक भेट वरचेवरी देत जा. तुला योगक्रियेची जाण आहे त्यामुळे क्षणात तू ह्या आकोटी येऊन माझी भेट घेऊ शकतोस. दांभिक गुरु तर फक्त पोटभरू असतात. लोकांना समजलं की महाराज आणि नरसिंगजी एकमेकांना भेटले आहेत. तो आनंदसोहळा बघण्यासाठी लोक यायला निघाले तर महाराज इथे वायुगतीने निघाले.

पुढे एकदा महाराज भ्रमण करीत असताना शिवर गावाजवळ आले होते. तिथे वज्रभूषण म्हणून राहत होता. चार भाषा ज्याला अवगत होत्या. सूर्यभक्त होता. ज्याची प्रसिद्धी अवघ्या वऱ्हाड प्रांतात होती. सूर्यदेवाला तो अर्घ्य देत होता. अशाच एके दिवशी सूर्याला अर्घ्य देताना सूर्याप्रमाणे तेजस्वी महाराजांचे दर्शन त्याला झाले. असा पुरुष पाहताच वज्रभूषण मनी एकदम आनंदला. त्यांच्याजवळ धावून गेला आणि त्यांच्या पायावर अर्घ्य दिले. त्यांना प्रदक्षिणा घातली. नमस्कार केला. मित्राय नमः । सूर्याय नमः । असा नामजप पण केला. आरती पण केली. प्रार्थनापूर्वक नमस्कार करुन साष्टांग नमन केले. म्हणाला की, ‘‘महाराज, आज माझ्या तपआचरणाचे मला फळ मिळाले. अशा दिव्य चरणांचे दर्शन आज मिळाले. मी धन्य झालो. तुझ्या दर्शने भय, रोग, चिंता सर्व दूर झाले आहे’’. आई आपल्या लेकराला कशी जवळ घेते तसे महाराजांनी वज्रभूषणाला आपल्या पोटाशी धरले. मस्तकावर हात ठेवून आशीर्वाद दिला.

‘‘तुझा सर्वदा जयजयकार होईल बाळा वज्रभूषणा ! कर्ममार्ग सोडू नकोस. कुठला विधी निरर्थक मानू नकोस’’. असं म्हणून प्रसाद दिला श्रीफळाचा आणि महाराज शेगावी परत आले. पूर्वी शेगावचे नाव शिवगाव होते आणि अपभ्रंश होऊन ते शेगाव झाले. महाराज सतत सगळीकडे भ्रमण करायचे. श्रावण महिन्यात शेगावी

मारुतीच्या देवळात उत्सव असे. महिनाभर हा उत्सव चाले. पाटील मंडळी भक्त होती त्यामुळे अभिषेक, पोथी, कीर्तन, गजर अशा अनेक सेवा होत होत्या.

खंडू पाटील हे उत्सवाचे प्रमुख होते. त्यांचे मन खूप उदार होते. महाराज उत्सवासाठी मारुतीच्या देवळात आले. तेव्हा बंकटलालाला म्हणाले, ''बंकटा रागवू नकोस, पण आता मी इथे ह्या देवळातच राहीन. तू ज्या दिवशी बोलावशील त्या दिवसापुरता येईन. माझ्या म्हणण्याला मान दे, त्यात तुझेच कल्याण आहे''. निरुपाय झाला बंकटाचा. त्याने होकार दिला. सर्वांना खूप आनंद झाला. भास्कर पाटील महाराजांच्या सेवेसाठी निरंतर राहणार होता. अशाप्रकार गजानन विजय ग्रंथ कथासाराचा - षष्ठ-सहाव्वा अध्याय इथे संपूर्ण झाला.



# श्रीगजानन विजय कथासार - अध्याय ७वा

आता सप्तम अध्यायाला सुरुवात करुया. गजाननाच्या कृपेने सर्व भक्तांचे कायम भलेच झाले आहे. त्याच्या अमोघ अशा कृपेचा लाभ भक्तांनी अनेक वेळा घेतला आहे. ज्याला त्यांचा आशीर्वाद लाभला तो सदा विजयी होतो.

सहाव्या अध्यायात आपण पाहिले की शेगावी मारुतीचा उत्सव सुरू होता. त्याचे पुढारी खंडू पाटील होते. धनसंपन्न हे त्यांचे घर. पूर्वीपासूनच त्यांचे घराणे धनसंपन्न होते. महादजी पाटील ह्यांना दोन पुत्र होते. मोठ्या मुलाचे नाव कडताजी होते. तर धाकट्याचे कुकाजी. कडताजीला सहा पुत्र होते. पण कुकाजीला मात्र अपत्य नव्हते. कडताजी काही कारणाने मरण पावला. मग त्याच्या मुलांचे संगोपन कुकाजीने केले. आपल्या स्वतःच्या मुलांप्रमाणे त्याने संगोपन केले. कुकाजीनंतर खंडू पाटील हा सर्व सांभाळ करायचा. गणपती, नारायण, मारुती, हरी आणि कृष्णाजी असे भाऊ होते. सत्ता पाटलांची होती. पैशाचा धूर निघत होता. कुस्तीचा त्यांना शौक होता. हरी पाटील उत्तम दांडपट्टा खेळत असे. गावात त्यांचा जयजयकार होता. नेहमी वादावादी, मारामाऱ्या ह्या पाटलांमुळे शेगावात होत असत. पण रयतेला सत्ता त्यांची असल्याने झेलणे सर्व भाग होते.

ही पाटील मंडळी राउळात येऊन महाराजांना त्रास देण्याचे काम करत होती. वेड्यापिश्या गण्या, खातोस का ताककण्या? असं सगळं बोलून ते महाराजांना त्रास देत होते. महाराजांची ते हेटाळणी करत होते. लोक तुम्हांला योगेश्वर म्हणतात, त्याचं प्रत्यंतर दाखव. असा दिवस-रात्र उर्मट प्रकार देवळात चाले. भास्कर पाटील समर्थांना म्हणाला, महाराज ही पोरे माजली आहेत, लक्ष्मीने धुंद

झाली आहेत. तयांच्या सत्तेपुढे काही न चाले. गजानन महाराज त्यावर म्हणाले, भास्कर, अरे थांब जरा. एवढ्यात निर्णयावर जाऊ नकोस. ही पाटील मंडळी सारी माझी परम भक्त आहेत. त्यांच्या अंतरात शोधून पाहा. ही पोरे पाटलांची आहेत माझी लेकरे. कृपा आहे संताची त्यांच्या घराण्यावर. जमीनदाराचे उर्मटपण हेच भूषण आहे. मऊ तलवार उपयोगी आहे का ? सांग बघू.

एके दिवशी हरी पाटील मारुतीच्या मंदिरात आला. महाराजांचा हात धरून म्हणाला, ''चल, मी तुला कुस्तीत चीत करतो, चल तालमीत जाऊ. इथे बसू नकोस नुसता गण गण गणांत बोते करत. महाराजांना कौतुक वाटले. ते जमिनीवर खाली बसले आणि हरी पाटलाला म्हणाले की, चल, आता मला इथून उठव''. असं म्हटल्यावर हरी पाटील त्यांना हाताला पकडून उठवू लागला. पण हरी घामाघूम झाला तरी त्याला जमत नव्हते. मनात तो विचार करू लागला की आपण इतक्या खोड्या काढल्या ह्याच्या, पण आपण जंबूक जसा कोल्ह्याच्या चेष्टेला दुर्लक्ष करतो तसं झालं. तो महाराजांपुढे नतमस्तक झाला. महाराजांना म्हणाला, ''महाराज, मला क्षमा करा''. समर्थ हरीला म्हणाले, चल, आता मला बशीस द्या. कुस्ती हा मर्दानी खेळ आहे. पण त्याचा गर्व करु नये. त्याने शरीरबळ वाढवावे. त्या दिवसापासून हरीचे पूर्ण गर्वहरण झाले. त्याचे सर्व भाऊ त्याला म्हणायला लागले की, अरे तू ह्या वेड्याला काय मानतोस ? त्याच्यापुढे नतमस्तक काय होतोस ? सर्व भाऊ एकदा मंदिरात आले आणि महाराजांना म्हणाले अरे, ह्या उसाचा रस प्यायचा आहे का ? पण आमची एक अट आहे. ह्या उसाचे प्रहार करू आम्ही तुझ्यावर आणि तू खरा योगी असशील तर वळ येणार नाहीत तुझ्या अंगावर. महाराज काही बोलले नाहीत. गणपती म्हणाला की मौन हीच ह्याची संमती आणि त्यांनी महाराजांच्या अंगावर उसाचे प्रहार करायला सुरवात

केली. मंदिरात जे नारी-नर होते ते हा प्रकार बघून घाबरले. भास्कर मुलांना थांबवण्याचा प्रयत्न करत होता. पण ते थांबत नव्हते. धान्यांच्या ओंब्या काढताना शेतकरी कसा झोडपतो तसे ते झोडपत होते. महाराज अजिबात डगमगले नव्हते. त्यांच्या अंगावर कोठेही वळ उमटले नव्हते. ते पाहून मुलं पण घाबरली. त्यांचे चरण धरून म्हणाली की तुम्ही खरंच आहात योगेश्वर. महाराज, मुलांना म्हणाले दमलात ना. थांबा तुमच्या श्रमाचा नाश करतो, ह्याच उसाचा रस महाराजांनी चरकाशिवाय पिळला. मुलांना आश्चर्य वाटले. खरंच ही होती महाराजांची योगशक्ती. त्या शक्तीला वंदन. गजानन महाराज हे साक्षात ईश्वर आहेत. त्याचा परत प्रत्यय सर्वांना आला.

कुकाजी एक दिवस खंडू पाटलाला म्हणाला, ''अरे आता माझा वृद्धपकाळ जवळ आला. पण अजूनही तुला मुलंबाळं नाही रे. मला नातवंडांची हौस आहे. महाराजांना ह्याची विनंती कर ना तू. जर ते खरे साधू असतील तर तुझी इच्छा नक्की पुरवतील''.

खंडूने महाराजांना प्रेमाने गण्या अशी हाक मारली व आपल्या मनातील सर्व महाराजांना सांगितले. खंडू पाटील म्हणाला, ''मी तुमचा सेवक असून का आहे निपुत्रिक ?'' महाराज म्हणाले, अरे तुझीच ह्या शेगावी सत्ता आहे मग माझ्यापुढे का याचना करतोयस ? मग तो ब्रम्हदेव का नाही तुझी आज्ञा पाळत ? खंडू म्हणाला, महाराज, अहो मी शेती करेन पण ती शेती पिकण्यासाठी आवश्यक पाऊस तुम्हीच पाडू शकता ना ? खंडूचे बोलणे ऐकून महाराजांना हसू आले. महाराज म्हणाले आज ही याचना तू मजजवळ केलीस म्हणजे एक प्रकारची भीक मागितलीस. तुला पुत्र व्हावा अशी विनंती मी परब्रम्हाकडे करतो. तो माझे नक्की ऐकेल. त्याला हे जड नाही. तुझ्या पुत्राचे नाव भिक्या ठेव.

खंडूने हे सर्व घरी येऊन कुकाजीला सांगितले. कुकाजीला खूप आनंद झाला. महाराजांनी सांगितले, दरवर्षी ब्राम्हणांना भोजन घालत जा आमरसपुरीचे आणि बायकोला दोन आंब्यांचा रस खायला दे. काही दिवसांनी महाराजांचे वचन सत्य झाले. खंडू पाटलाची बायको गर्भवती राहिली होती. नवमास हळूहळू पूर्ण झाले. तिला पुत्र झाला. कुकाजीच्या आनंदाला पारावार नव्हता. त्याने देवधर्म केला व अन्नदान केले. पाटलाचा बोलबाला व नावलौकिक शेगावात झाला, पण देशमुख आणि पाटलांमध्ये पक्के वैर होते. ३६ चा आकडा त्यांच्यामध्ये होता. कुकाजीला स्वर्गवास झाला. खंडू पाटलाला खूप वाईट वाटले. त्याचे मन उद्विग्न झाले होते. त्याचा आधार आज हरपला होता. देशमुखांसाठी ही चांगली संधीच होती पाटलांवर बालंट आणण्यासाठी. ती गोष्ट आठव्या अध्यायातील कथासारामध्ये ऐकूया. अशा प्रकारे गजानन विजय कथासाराचा सप्तम अध्याय इथे समाप्त झाला.



# श्रीगजानन विजय कथासार - अध्याय ८वा

महाराजांच्या कृपेचे खूप अनुभव आपण याआधी पाहिले आहेत. आपला बुद्धी देणारा हा बुद्धिदाता परमेश्वर असतो. तीर्थयात्रा करण्यासाठी शरीरामध्ये ताकद असेल तर मनापासून सर्व यात्रा आपण त्यांच्या स्मरणानेही करु शकतो. भगवंताच्या कृपेने तर दगडालाही पाझर फुटू शकतो. देशमुख व पाटलांमध्ये दुफळी माजली होती.

जिथे-जिथे ही दुफळी असते तिथे ही होळीच करत असते. सर्व सुखाची राख रांगोळी हिच्यामुळे होत असते. खंडू पाटलाशी एक दिवशी तळ्याच्या काठावर देशमुखांचा एक महार उगाचच चरचर करत होता. काही कामावरुन दोघांमध्ये कुरबुर झाली होती.

देशमुखांचा जोर महाराला होता म्हणून तो उगाच अधिक बोलत होता. उगीच उलट उत्तर तो पाटलाला देत होता. पाटील म्हणाला की, ''अरे तुझी ही रीत योग्य नाही. गरिबाने आपली पायरी सोडू नये. उणं बोलण्याचा अधिकार त्या देशमुखाचा आहे. तुझा नाही''. तरी पण तो महार ऐकेना. त्याचं भाषण ऐकून खंडू पाटील खवळला मनातून. बाचाबाचीचे कारण खरेतर अगदी क्षुल्लक होते. खंडू पाटलांनी तहशिलाच्या इथे कागद पाठवण्यासाठी त्या महाराला अकोल्याला जायला सांगितले होते. ते तो महार ऐकत नव्हता. तुमचा देशमुखांच्या आश्रितावर डोळा आहे असा उलट खंडू पाटलासह तो वाद घालत होता. आज मी हा कागद घेऊन जाणार नाही तुझ्या हुकुमावरुन. बोंबा शिमग्याच्या ह्या समजतो मी असं म्हणून त्याने तसा हावभाव पण केला. ही कृती पाहून खंडू पाटील कोपला. भरीव वेळूची काठी हातात होती, त्याने महाराच्या हातावर प्रहार केला. तसा महाराचा हात

मोडला. महार बेशुद्ध होऊन जमिनीवर पडला. त्याच्या आप्तांनी उचलून त्याला देशमुखांच्या सदनी नेले. कचेरीला तत्काळ महाराला नेले देशमुखाने. कुरापती काढण्याची संधी त्याला मिळाली होती त्यामुळे तो आनंदला होता. अपराधाची नोंद झाली. अधिकाऱ्याला आज्ञा झाली पाटलाला पकडून आणण्याची. शेगावी सगळीकडे ह्याचीच चर्चा चालू होती. ते खंडू पाटलाला समजले होते. त्याचे धाबे दणाणले होते. त्याच्या तोंडचे पाणी पळाले होते. तो चिंतातुर झालेला. मेल्याहून मेल्यासारखे खंडू पाटलाला वाटत होते.

सर्व भाऊसुद्धा काळजीत होते. त्याने ठरविले की आपण महाराजांना साकडे घालूया. त्याने महाराजांच्या चरणावर मस्तक ठेवले व मनातील सगळी घालमेल त्यांना सांगितली. महाराज, माझ्यावर कठीण प्रसंग आला आहे. काट्याचा नायटा केलाय देशमुख मंडळींनी माझे अहित करण्यासाठी. त्यानिमित्त मला उद्या कैद होऊ शकते. बेड्यांमध्ये हातपाय बघण्यापेक्षा गुरुवरा, आजच माझा गळा इथे घोटा. बेइज्जतीचे मरण नको मला. ही घ्या तलवार आणि माझा अंत करा तुमच्या चरणी. समर्था, माझे रक्षण करा. कृष्ण नाही का द्रौपदीसाठी धावून आला आणि असं म्हणून खंडू पाटील रडू लागला. त्याच्या डोळ्यांतून अश्रूंचा पूर वाहू लागला. महाराजांनी त्याचे सात्वन केले व म्हणाले, रडू नकोस, अरे अशी संकटे येतात जातात. तू त्याची चिंता करू नकोस. तुम्ही पाटील-देशमुख एकाच जातीचे असून एकमेकांच्या विरोधात उठला आहात. तुमच नुकसान आहे ह्यात नाही का? कौरव-पांडवांनी एकमेकांशी शत्रुत्व घेतल्यानं महाभारत नाही का घडलं? महाराज म्हणाले जा भिऊ नकोस. बेडी नाही पडणार तुला.

संताच्या मुखातून निघालेले कधी खोटे होते का सांगा? आणि तसेच झाले. खंडू पाटलाची निर्दोष सुटका झाली. खंडू पाटील मुद्दाम

महाराजांना दोन दिवस त्याच्या घरी रहायाला घेऊन गेला. त्या वेळी तिथे ५ ते १० तेलंगी ब्राम्हण आले होते. ते कर्मठ होते. वेदाभ्यास होता, पण मनात अजूनही धनाचा लोभ होता. काही विशेष मिळेल का म्हणून ते समर्थांच्या इथे आले होते. समर्थ अंगावर पांघरुण घेऊन झोपले होते. समर्थांना उठवण्यासाठी ते मोठमोठ्या स्वरात मंत्र म्हणत होते. मंत्र म्हणताना त्यांची चूक झाली, पण ती त्यांनी दुरुस्त केली नाही. महाराज जागेवर ऊठून बसले आणि ब्राम्हणांना म्हणाले, तुम्ही वैदिक का झाला आहात? वेदविद्येला हीनत्व आणू नका तुम्ही. ही विद्या पोटासाठी नाही. मोक्षदात्री आहे. त्याची काहीतरी किंमत ठेवा. सोंग घेऊन उगीच भोळ्या भाविकांना फसवू नका तुम्ही. जो अध्याय ते ब्राम्हण म्हणत होते तोच पूर्ण अध्याय समर्थांनी म्हणायला सुरुवात केली. तोच अध्याय त्यांनी घडाघडा म्हणून दाखवला. स्पष्ट शब्द उच्चारात, कुठे न अडखळता महाराजांनी वेद म्हणून दाखवले. सूर्याचा उदय झाल्यावर त्याच्यापुढे काजव्यांचा जयजयकार थोडाच होणार.

वैदिक ब्राम्हणांनी मनात विचार केला की, हे महाज्ञानी आहेत. प्रत्यक्ष विधाताच आहेत हे. काहीतरी पुण्य आपल्या पदरी होते म्हणून आज महाराजांचे दर्शन आपल्याला झाले. खंडू पाटलांकडून सगळ्या ब्राम्हणांना रुपया रुपया दक्षिणा दिली. सर्व ब्राम्हण संतुष्ट झाले आणि दुसऱ्या गावी निघून गेले. महाराज पण कंटाळले होते. गावाच्या उत्तरेला एक मळा होता. त्या मळ्यात भाजीपाला लावलेला होता. तिथे एक शिवाचे मंदिर होते. सर्व झाडेतिथे असल्याने तिथे छान सावली होती. लिंबाच्या झाडामुळे सुरेख सावली पडली होती. कृष्णाजी हा खंडूजीचा सगळ्यांत धाकटा भाऊ होता. त्या मळ्यात महाराज आले आणि शिवालयासन्निध बसले. निंबाच्या झाडाच्या सावलीत बसले होते. समर्थ कृष्णाजीला म्हणाले अरे, तुझ्या सान्निाध्यात हा भोलेनाथ

रमला आहे. हा अवघ्या देवांचा देव आहे. तो तुझ्या मळ्यात रमला आहे. म्हणून मी पण विचार केला इथे येऊन राहण्याचा. मला इथे सावली दे करून. कृष्णाजीने महाराजांचे शब्द ऐकताच सहा पत्रे आणले. ओट्यावरती छप्पर केले. समर्थांनी त्या मळ्यात वास केला म्हणून तो मळा हे एक क्षेत्रच झाले. राजा जिथे, तिथे प्रजा असतेच. महाराजांची सेवा करण्यासाठी महाराजांबरोबर भास्कर पाटील व तुकाराम कोकाटे तिथे राहत होते. खाण्या-पिण्याची इतर सोय सर्व कृष्णाजी पाटलाने केली होती. एके दिवशी फिरता-फिरता दहा-वीस गोसावी त्या मळ्यात आले. समर्थांचा नावलौकिक आधीच त्यांनी ऐकला होता म्हणून त्यांनी मुद्दाम मळ्यात तळ ठोकला. गोसावी पाटलाला म्हणाले, ''तुम्ही ह्या गोसाव्याला तुमच्या मळ्यात जागा देता. आम्ही ब्रम्हगिरी गोसाव्याचे भक्त आहोत. आम्हाला ३ ते ४ दिवस इथे राहू दे. गांजा पण आम्हांला ओढण्यासाठी पुरवा. गाढवाला पोसताय आणि गाईला लाथ मारताय''. सर्व ऐकल्यावर कृष्णाजी म्हणाला की, ''आज भाकरी आहे. उद्या शिरापुरीचा नैवेद्य दाखवेन. त्या पत्र्यांपासून बनवलेल्या घरात आमचे स्वामी गजानन बसले आहेत. तिथेच भोजनास बसा. जितका गांजा ओढाल तितका तिथे मिळेल. आमचे महाराज साक्षात परमेश्वर आहेत''.

कृष्णाजीने त्या पत्र्याभोवती आसने लावली व त्यांचा जो महंत होता 'ब्रम्हगिरी' तो भगवद्‌गीता वाचू लागला. सर्व गोसावी ऐकायला बसले. गावातून काही लोक मुद्दाम प्रवचन ऐकायला आले. पण तो गोसावी पक्का दांभिक होता. त्याचे निरुपण गावातील लोकांना आवडले नाही. पोथी ऐकल्यावर सर्वजण गजाननाच्या समोर जाऊन बसले व कुजबुजू लागले की, महाराज तर चालते-बोलते परमेश्वर आहेत, ज्यांनी हा सर्व स्वानुभव घेतला आहे. सर्व ऐकून त्या ब्रम्हगिरी गोसाव्याला लोकांचा राग आला. सर्व गोसावी गांजा पीत बसले होते.

महाराजांना चिलीम भरून भास्कर वरच्यावरी प्यायला देत होता. महाराज पलगांवर बसले होते. तेव्हा एक ठिणगी त्या पलंगावर पडली. काही वेळ गेल्यावर धूर यायला लागला व तो पलंग पेटला चहूबाजूंनी. तो प्रकार पाहून भास्कर म्हणाला, ''गुरुराया, पलंग शीघ्र सोडा. पलंगाची लाकडे ही सागाची आहेत. ती पटकन विझणार नाहीत''. महाराज म्हणाले, ''अरे भास्करा तू अजिबात पाणी आणू नकोस. ब्रम्हगिरी महाराजांना तर खरी गीता अवगत आहे. त्यांच्या परीक्षेची वेळ भगवंताने लगेच आणली. ह्या ब्रम्हगिरी महाराज, बसा या पलंगावर. नैनं छिन्दन्ति श्लोकावर तुम्ही १ प्रहर प्रवचन केलेत ना! मग आता कसली तुम्हांला भीती. जा भास्करा, त्यांचा हात धर आणि त्यांना इथे घेऊन ये''. अशी आज्ञा होताच भास्कर लगेच ब्रम्हगिरीला हाताने पकडून घेऊन आला आणि अतिशय आदराने त्यांना इथे आणा असे महाराजांनी सांगितले होते. भास्कर धिप्पाड होता. पिळदार त्याचे शरीर होते. पलंग चौफेर पेटला होता, पण महाराज जागचे हलले नव्हते.

भास्कर हाताला धरून ब्रम्हगिरींना घेऊन आला. ब्रम्हगिरी त्याला म्हणाला, ''नका मला नेऊ त्या पलंगाजवळ. मी चुकलो. मी महाराजांचा अधिकार जाणला नाही''. 'नैनं दहति पावकः' हे वाक्य खरं करुन दाखव असं महाराज म्हणाले. ब्रम्हगिरी घाबरत म्हणाला की, ''मी पोटभऱ्या संत आहे. मी त्यांना 'पिसा' म्हणालो. चुकलं माझं, मला माफ करा. मी तुम्हांला शरण आलो आहे''.

शेगावच्या जनतेने महाराजांना विनवणी केली की तुम्हांला अग्नीचे भय नाही. पण आमच्यासाठी महाराज, तुम्ही खाली उतरा. आम्हांला हे सगळं बघूनच भीती वाटतेय. महाराज भक्तांच्या विनंतीला मान देऊन खाली उतरले तसा तो पलंग खाली कोसळला.

ब्रम्हगिरीने महाराजांना साष्टांग नमन केले. गंगाजलाला स्पर्श केल्यावर मल कोठून राहणार. मध्यरात्री महाराजांनी ब्रम्हगिरीला उपदेश केला. आजपासून तू या चेष्टा सोडून दे. ज्यांनी अंगाला राख लावली, त्यांनी उपाधी दूर ठेवावी. नुसता शब्दपंडित होऊ नकोस. उगीच शिरापुरी खाण्यासाठी इथे तिथे भटकू नकोस. असा बोध मिळाल्याने ब्रम्हगिरी विरक्त झाला. दुसऱ्या दिवशी कोणाला न भेटता सकाळी लवकर निघून गेला सर्व शिष्यांसह. गावामध्ये सर्व ठिकाणी ही गोष्ट समजली. जो तो येऊन पलंग बघत होता. कसा जळलाय? ह्या गोष्टीने महाराजांचा नावलौकिक अधिक वाढला. अशा प्रकारे गजानन विजय ग्रंथ दासगणू रचित कथासाराचा अष्टमोध्याय पूर्ण झाला.



# श्रीगजानन विजय कथासार - अध्याय ९वा

श्रीगणेशाला वंदन करुन अध्याय सुरु करु या.

लहानांशिवाय मोठ्यांचे मोठेपण कसे टिकणार ? परीसस्पर्शाने लोहाचे रुपांतर सोन्यामध्ये होते. म्हणून त्याचे महत्त्व आहे भूमीवर. गोदावरी ओहोळ पोटी घेते म्हणून तिला तीर्थस्थानाचे महत्त्व प्राप्त झाले आहे. महाराज, तुमच्या मानसीला तुमचा आधार कायम राहू दे. चांगली कर्मे करण्याची अशीच बुद्धी द्या.

गोविंदबुवा टाकळीकर हे मोठे कीर्तनकार होते. ते शेगावी मुद्दाम कीर्तनासाठी आले होते. तिथे शंकराचे एक जुने मंदिर होते, ज्याचा जीर्णोद्धार मोटे नामक एका सावकाराने केला होता. श्रीमंत होता सावकार, पण चांगले विचार व श्रेष्ठ भक्तिभाव त्याच्या ठायी होता. त्याच्या हस्ते हा जीर्णोद्धार झाला होता. म्हणून हळूहळू लोक मोट्यांचे मंदिर म्हणून ओळखायला लागले. त्या मोट्यांच्या मंदिरात एकदा कथाकार टाकळीकर उतरले होते. त्यांचा घोडा मंदिराच्या समोर बांधला होता. तो घोडा अतिशय द्वाड होता. येणाऱ्या-जाणाऱ्यांना तो लाथ मारत असे. समोरुन कोणी आले तर कुत्र्यासमान त्यांना चावत असे. त्याचे चित्त स्थिर नव्हते. दिवसरात्र खिंकाळत असे. कधी पळून जाई. अशा अनेक खोड्या तो घोडा करत होता. त्या घोड्याला लोखंडी साखळीने बांधून ठेवायला लागत असे. पण त्या दिवशी टाकळीकरबुवा घोड्याला लोखंडी साखळीने बांधायचे नेमके विसरुन गेले. टाकळीकरबुवांनी कसेबसे घोड्याला मंदिरासमोर बांधले व ते झोपायला गेले.

रात्रीचा दोन प्रहर झाला. टिटव्यांचा टि टि आवाज येत होता. वटवाघुळं फिरत होती. सामसूम झालेली सगळीकडे. रस्त्यावर सगळीकडे शुकशुकाट होता. संत भूमीवर जन्म मुळात लोकांमध्ये

चांगले गुण आणि वृत्ती निर्माण करण्यासाठी घेत असतात. जसे औषध रोगावर गुणकारी ठरते. तसे साधुसंत द्वाडपणाचे निवारण करतात. महाराज रात्रीच्या समयी घोड्याला जिथे बांधले होते तिथे आले. रात्रीच्या शांततेत महाराज त्या घोड्याच्या चार पायांमध्ये जाऊन झोपले. मुखाने सतत 'गण गण गणांत बोते' हे नामस्मरण चालू होते. ह्या सूत्ररुप भजनाचा अर्थ, जीवात्मा म्हणजे गण तो ब्रम्हाहून वेगळा नाही हे सुचवण्यासाठी गणांत, बोते हा शब्द ऐका किंवा तुम्ही असा बोध ह्यातून घ्या, असे वाटते. मनाला नित्य ब्रम्ह समजावे. तुमचे अंतरमन तुम्हाला योग्यच सुचवते.

काही भक्त 'गिण गिण गिणांत बोते' असे सुद्धा म्हणतात. महाराजांच्या मुखातून सतत वरील भजन चालू होते. ह्या भजनरुप साखळीने त्यांनी घोडा बांधून टाकला. गोविंदबुवांना मनात घोड्याच्या खोड्यांविषयी काळजी होती. म्हणून ते मधे-मधे उठून घोड्याकडे बघत होते. घोड्याला बघितले तर घोडा एकदम शांत होता. गोविंदबुवांना वाटले घोड्याला कोणता रोग तर नाही ना झाला, त्यांना मनातून आश्चर्य वाटत होते. आजपर्यंत कधीच तो एवढा स्थिर नव्हता. त्यांनी लांबून बघितलं तर कोणीतरी माणूस घोड्याच्या चार पायांमध्ये निजला आहे असे त्यांना वाटले. जवळ जाऊन बघितले तर त्यांना महाराज दिसले. मग ते म्हणाले ''मला आता कळले की, घोडा का शांत झाला? समर्थांच्या सहवासामुळे घोडा शांत झाला. त्यामधील द्वाडपणा संतसंगतीमुळे निघून गेला. आता तो घोडासुद्धा मुखाने भगवंताचे स्तवन करतोय. सर्वच ह्या घोड्याच्या खोड्यांनी त्रासले होते. माझा घोडा हा अति द्वाड होता. सर्व त्याला घाबरायचे. फुकटसुद्धा मी लोकांना देत होतो, पण कोणी घ्यायला तयार नव्हते.'' महाराज घोड्याला म्हणाले, ''अरे आता परत नको करु खोड्या ! बैलाप्रमाणे वागत जा. कोणाला त्रास देऊ नकोस''. असं म्हणून दयाघन

महाराज तिथून निघून गेले. दुसऱ्या दिवशी बरेच लोक मळ्यात गोविंदबुवांना भेटायला आले. लोक घोड्याला मळ्यांत पाहून गोविंदबुवांना म्हणाले, ही पीडा इथे कशासाठी. आमची मुलेबांळ पण इथे आली आहेत. तुमचा घोडा सहज त्यांचा घात करेल.

गोविंदबुवा सर्वांना म्हणाले की, मी तुमचं म्हणणं ऐकून घेतलंय. आता तुम्ही कालचा अनुभव ऐका. शेगावीच्या महाराजांनी काल माझ्या घोड्याला शहाणे केले आहे. त्याने कालच सर्व खोड्या टाकून दिल्या. आता तो गोगलगाईसमान झाला आहे. आता घाबरायचे कारण कोणालाच नाही. चिंचेच्या झाडाखाली घोड्याला उभे केले होते. मळ्यामध्ये कोवळा भाजीपाला होता. त्याला घोड्याने अजिबात तोंड लावले नाही. संताची केवढी शक्ती असते पाहा. पशुसुद्धा त्यांच्या आज्ञेत वागतात. पऱ्याच्या झोपडीत गोविंदबुवांनी महाराजांची स्तुती आरंभली. असो खल केवढाही, तुझ्या कृपेने सुमार्गी वळे. अशी स्तुती करुन गोविंदबुवा आपल्या घोड्याला घेऊन टाकळी गावाला निघून गेले.

प्रत्येक दिवशी शेगावासी नवीन यात्री येत असे. मनात काहीतरी हेतू धरून ते येत असत. असेच त्या दिवशी बाळापूरचे दोन गृहस्थ मनात हेतू धरून समर्थांच्या दर्शनाला आले होते. रस्त्यावरुन चालताना एकमेकांशी बोलत होते की पुढच्या वेळी आपण सुकलेला गांजा घेऊन येऊ. गांजावरी महाराजांचे खूप प्रेम आहे. आपण जर तो त्यांना अर्पण केला तर त्यांची आपल्यावर निश्चित कृपा होईल. धोतराला गाठ बांधून ठेवू आपण. म्हणजे विसरायला होणार नाही. लोकांना आणू दे बर्फी पेढे. आपण गांजा आणूया. पुढल्या वारीला आले दोघं परत, पण गांजा आणायला विसरले. महाराजांच्या पायावर डोकं ठेवल्यावर त्यांना गांजाची आठवण झाली. परत पुढल्या वेळेला तेच झाले. हात जोडून बसले. पण गांजाविषयी विसरुन गेलेले.

महाराज म्हणाले भक्तांना, बघा हे धोतराला गाठ मारुन ठेवतात. पण वस्तू आणायला विसरतात. बघा ही कशी आहे जगाची रीत. जातीने ब्राम्हण आहेत. ब्राम्हणांनी कधीही त्यांचा शब्द अपप्रमाण करु नये. मनात नवस करतात आणि हात हलवीत येतात. अशाने का पूर्ण होते मनोरथ? बोलण्यामधे मेळ असावा. चित्त निर्मळ असावे. तरच तो घननीळ भास्कर कृपा करतो. हे शब्द त्यांना मनासी लागले. एकमेकांकडे कुतूहलाने बघत होते. पाहा, केवढे अगाध ज्ञान आहे. जगतचक्षू गजानन सूर्याप्रमाणेच आहेत.

आपण मनामध्ये केलेला नवस पण त्यांनी जाणिला. ते दोघेही गावातून गांजा आणण्यासाठी निघाले. महाराज म्हणाले, मी काही ह्या गांजाप्रती हपापलो नाही आहे. नका जाऊ पेठेमध्ये गांजा आणायला. बोलण्यामध्ये मेळ ठेवा. कायम लबाडांचे ताळतंत्र मी न जाणे. भगवंत लबाडांचे हेतू पुरवत नाही ही खूणगाठ कायमची बांधून ठेवा. तुमचे काम पुढील आठवड्यात पूर्ण होईल. तेव्हा वाटलं तर गांजा घेऊन या. जा, ५ वाऱ्या येथील करा. नेम कधीही चुकवू नका. त्यांनी महाराजांना वंदन केले. 'शिव' शंकराचे दर्शन घेतले व बाळापुराला निघून गेले. पुढील आठवड्यात त्यांचे काम फत्ते झाले व ते दोघे गांजा घेऊन शेगाव वारीला आले.

बाळापुरामध्ये बाळकृष्ण नावाचा एक रामदासी होता. त्याची पत्नी पुतळाबाई ही भाविक होती. दरवर्षी ती सज्जनगडावर पायी वारीला जात असे. पौष महिन्याची सुरुवात झाली की हे दोघे नवरा-बायको घोड्यावर सामान ठेवून वारीसाठी निघत. त्यांचा भाव शुद्ध होता. त्यांना साधुत्वाचा अहंकार नव्हता. चालताना गावोगावी झोळीत ते भिक्षा मागत असत. त्या भिक्षेवरी त्यांचा नैवेद्य होत असे रामासाठी. बाळकृष्णबुवांच्या हाती चंदनाच्या चिपळ्या असत. पुतळाबाई झांजा वाजवत असे. रघुपती नामाचा गजर करत, शेगाव, खामगाव,

मेहेकर, देऊळगाव, अशा गावोगावी पुढे जात जालनापुरीत आनंद स्वामींना वंदन करत. जांबू नगरीमध्ये ३ दिवस मुक्काम करत असत. बीडला अंबेजोगाईचे दर्शन, समर्थांचे पट्टशिष्य बेलश्वर स्वामींचे दर्शन मोहोरी येथे, डोमगाव, कल्याण, पंढरपूर, शिंगणापूर, वाई, सातारा असं पुढे येत. बरोबर माघ वद्य प्रतिपदेला ते सज्जनगडाला दासनवमीच्या उत्सवासाठी पोहोचत असत. माघ वद्य द्वादशीला ते सज्जनगडाहून बाळापुरासी जाण्यास निघत असत.

बाळकृष्णबुवा वद्य एकादशीला समर्थांच्या समाधीपाशी बसले व म्हणाले, महाराज, माझे शरीर आता थकले आहे. मला पायी वारी करणे आता शक्य नाही. वाहनामध्ये बसून सज्जन गडावर येणं पण कठीण दिसतंय. आपल्यामध्ये याआधी कधीही अंतर आलं नव्हतं ते आज येतंय. हे रामदासा, माझ्या मातेसमान तुम्ही, लेकराच्या मनातील तुम्ही सर्व जाणता. अशी प्रार्थना करुन ते शय्येवर झोपून गेले. पहाटे त्यांना स्वप्न पडले. स्वप्नात रामदास स्वामी त्याला म्हणाले, अरे असा निराश होऊ नकोस. माझी कृपा तुझ्यावर कायम आहे. रामनवमीचा उत्सव तू ह्या बाळापुरामध्येच कर. मी नवमीला तुला दर्शन द्यायला तुझ्या घरी येईन हे प्रमाण मान. तुझ्या शक्तीनुसार परमार्थ कर. बाळकृष्णबुवा आनंदले व प्रसन्न चित्ताने आपल्या बायकोसह बाळापुरी परतले.

दुसऱ्या वर्षी माघ वद्य प्रतिपदेला समर्थांचा उत्सव बाळापुरास बाळकृष्णबुवांनी आरंभ केला. दासबोध वाचन, रात्रीला हरिकीर्तन, दोन प्रहरी ब्राम्हणभोजन, धूपारती असा साग्रसंगीत कार्यक्रम होता. गावकऱ्यांनी आपापसात वर्गणी गोळा करुन उत्सवाला साहाय्य केले. नऊ दिवस असा थाट बाळापुरी चालू होता. बाळकृष्ण बुवा मनी हाच विचार करत होते की, स्वामी कसे येतात इथे हे मला बघायचं आहे.

त्याच दिवशी दुपारच्या २ प्रहरी गजानन महाराज बाळापुरात अवतरले. रामनामाचा अभिषेक चालू होता. महाराजांना बघून लोकांना खूप आनंद झाला. बुवा म्हणाले, बरे झाले महाराज आले, पण आज मी रामदास स्वामींची वाट बघत होतो. त्यांनी मला वचन दिले आहे. इकडे महाराज दरवाजात उभे राहून जय जय रघुवीर समर्थ असा श्लोक म्हणत होते. अहिल्या शिळा राघवे मुक्त केली पदी लागता दिव्य होऊन गेली हे ऐकताक्षणी बाळकृष्णबुवा बघण्यासाठी दारी गेले. त्यांना गजानन महाराजांची मूर्ती दिसली. नमस्कार करण्यास खाली वाकले तर त्यांना रामदास स्वामी दिसले. कपाळावर त्रिपुंड्र होते गोपीचंदनाचे. हिरमुजी रंगाची लंगोटी. असे रुप बघताच त्यांना प्रेमाचे भरते आले. डोळ्यांमधून आनंदाश्रू आले. वर बघितल्यावर परत महाराज दिसत होते. ते पुनः हताश झाले. मनामध्ये ते घोटाळलेले बघून गजानन म्हणाले, ''अरे गांगरुन जाऊ नकोस. तुझा समर्थ मीच आहे. मागे माझीच वस्ती गडावर होती. आता मी शेगावी मळ्यात राहतो. मागे सज्जनगडावरती मी तुला वचन दिलेले की दासनवमीच्या उत्सवाला येईन बाळापुरी हे विसलास का ? त्या वचनाची पूर्तता करण्यासाठी मी मुद्दाम इथे आलो आहे. आता सगळ्या चिंता तू सोडून दे''. बाळकृष्णबुवांचा हात धरुन गजानन घरी आले. एका पाटावरी बसले. भरपूर भक्तगण येऊन महाराजांचे दर्शन घेऊन गेले.

दिवसभर बाळकृष्णबुवा विचार करत होते. रात्री त्यांना (३ प्रहरी) स्वप्न पडले. अरे, गजानन माझीच मूर्ती आहे. त्यामुळे तू संशय घेऊ नकोस. मी तोच समजून कर गजाननाचे पूजन. गीतेमधील वाक्य लक्षात ठेव, संशयात्मा विनश्यति. दुसऱ्या दिवशी त्यांनी समर्थांच्या चरणी मस्तक ठेवले व म्हणाले, महाराज, मला क्षमा करा. मी आपुली लीला जाणली नाही. मनातील घोटाळा तुम्ही स्वप्नात दृष्टांत देऊन दूर केलात. आता काही दिवस इथेच राहा.

महाराज म्हणाले, माझा विचार ऐक काही दिवस झाल्यावर मी परत येईन बाळापुरी. भोजनानंतर महाराज निघून गेले. क्षणात शेगावी पोहोचले. अशा प्रकारे गजानन विजय ग्रंथ कथासाराचा नववा अध्याय समाप्त झाला.



महाराज, तुमची अशीच कृपा आमच्यावर राहू दे. मला तुमच्या अशाच छत्रछायेत राहू दे. आता मी परक्याचा नाही. मी फक्त तुमचा आहे. माझ्या मनामधील पापवृत्ती नष्ट करा. तुम्ही मनात जे ठरविता ते घडून येतेच. महाराज एकदा उमरावतीला गेलेले, आत्माराम भिकाजीच्या घरी ते उतरले. उमरावतीतील मोठे प्रस्थ होते आत्माराम भिकाजी यांचे. कायस्थ प्रभू होते हे आणि संतांच्या सेवेची त्यांना आवड होती. महाराज त्यांच्या घरी गेल्यावर यथासांग त्यांनी महाराजांची पूजा केली. मंगलस्नान घातले. वेगवेगळी उटणी लावली. फुलांचा सुगंध तिथे दरवळत होता. छान रेशमी धोतरजोडा महाराजांना नेसवला. नैवेद्याचे नाना प्रकार केलेले. दक्षिणा म्हणून १०० रुपये महाराजांना ठेवले. धूपदीप अशी आरती झाली. दर्शनासाठी गर्दी झाली होती. प्रत्येकाला असे वाटत होते की, महाराजांना आपल्या घरी न्यावे. समर्थांची यथासांग पूजा करावी. पण सर्वांची ही इच्छा एकाच वेळी कशी पूर्ण होणार ! त्यासाठी उच्च प्रतीची श्रद्धा हवी. ज्यांच्या ठायी होती त्यांच्याकडे महाराज गेले. साधूसंतांना वेगळं काही सांगायची गरज नसते. अंतर्ज्ञानाने त्यांना ते समजते.

गणेश श्रीकृष्ण खापर्डे नावाचे वकील होते. मोठे प्रस्थ होते अमरावतीमधील. पैशांचे ढीग त्यांच्यापुढे पडत असत. दादासाहेब असं आदराने लोक त्यांना म्हणत. सज्जन आणि अत्यंत भाविक होते. महाराजांना त्यांनी त्यांच्या घरी येण्याची विनंती केली. तेथेही साग्रसंगीत पूजा झाली महाराजांची.

गणेशआप्पा म्हणून एक लिंगायत वाणी होता. चंद्राबाई त्याच्या पत्नीचे नाव होते. ती तिच्या नवऱ्याला सतत सांगत होती, अहो

महाराजांना आपल्या घरी घेऊन या ना. मला त्यांची पूजा करायची आहे. त्यांचे पाय आपल्या घराला लागता आपले घर होईल पवित्र. गणेशआप्पा तिला म्हणाला की, ''अगं तुला वेड लागलंय का? अगं त्यांना घरी आणायला मोठा वशिला हवा. उगाच हट्ट नको करुस''. बायको म्हणाली, अहो तुम्ही सांगताय ना ते माझ्या मनाला पटत नाहीये. माझी मनोदेवता म्हणते की, महाराज नक्की येतील. पण गणेशआप्पांचा काही धीर होईना महाराजांना सांगायचा. शेवटी महाराजांनीच त्याचा हात धरला व म्हणाले की, अरे मनात असेल ते बोलावे, असे घाबरुन थोडेच चालेल. तुझ्या घरी काही वेळ यावंसं वाटतंय, तूझं घर किती दूर आहे, तेवढं सांग मला. गणेशआप्पाला खूप आनंद झाला. समर्थांना घरी नेऊन यथासांग पूजा केली. अशा अनेक पूजा अमरावतीमध्ये झाल्या. त्या प्रत्येक पूजेला एक गृहस्थ हजर असे. तो म्हणजे आत्माराम भिकाजीचा भाचा. राहणारा मुंबईचा. तारमास्तर होता. पण रजा घेऊन आपल्या मामाला भेटायला आला होता. बाळाभाऊ त्याचे नाव होते. समर्थमाऊलीचे त्याला ध्यान लागले होते. प्रपंच शेवटी अशाश्वत असतो. त्यात आपले कशाला अडकवावे, म्हणून तो प्रत्येक पूजेला हजर होता.

काही दिवसांनी महाराज शेगावी परत आले. पण मळ्यात न जाता मोट्यांच्या मंदिराच्या पूर्वेला एक ओसाड जागा आहे तिथे थांबले. ही गोष्ट कृष्णा पाटलाला कळल्यावर त्याने मोट्यांच्या मंदिराजवळ येऊन महाराजांचे दर्शन घेतले. डोळ्यांतून अश्रू वाहत होते त्याच्या. वस्त्र पण त्याचे भिजून गेले. महाराज पाटलाला म्हणाले, ''अरे असं का वागतोस? एवढा का रडतोयस? शोक काय झाला तुला हे वेगे सांग मला''. पाटील दोन्ही हात जोडून म्हणाला महाराज, अहो तुम्ही मला सोडून इथे का आलात? माझ्या हातून काही गुन्हा झाला का? अहो तुमची मळ्यात राहायची मर्जी नसेल तर इथे नका

राहू. ही देशमुखांच्या बाजूची जागा आहे. जेव्हा सर्व पाटील मंडळींना हे वृत्त समजले तेव्हा ते सर्व महाराजांची समजूत काढायला तिथे आले. महाराज त्यांना म्हणाले की, ''तुमचं भलं आहे ह्यात म्हणून मी या जागेवर इथे येऊन बसलो. ह्यात संशय ठेवू नका. बंकटलालचे घर पण मी सोडले. तेव्हा काही क्षण त्यालाही वाईट वाटले. पण तो नाही रागावला. माझी अगाध कृपा तुमच्यावर आहे. ती कधीही ढळणार नाही, हे कायम लक्षात ठेवा''. बंकटलालही तिथे आला व पाटील मंडळींची समजूत काढत होता. म्हणाला की ''त्यांच्या मर्जीविरुद्ध नका नेऊ त्यांना मळ्यात. आपण त्यांची बालके आहोत. त्यांचे सतत लक्ष आपल्यावर असते. सखाराम आसोलकर जो ह्या जागेचा मालक आहे तो आहे मनाचा उदार. तो नक्की देईल जागा''. सर्वांना हे पटले. त्या ठिकाणी महाराजांसाठी छान मठ बांधला. समर्थांच्या बरोबर भास्कर, बाळाभाऊ, पितांबर, अमरावतीचा गणेशआप्पा व रामचंद्र गुरव हे ५ जण राहत होते. श्रीहरींचे जणू हे पाच पांडव होते.

बाळाभाऊची वृत्ती विरक्त झाली होती. महाराजांच्या सेवेमध्ये त्याचे चित्त रममाण झाले होते. घरून त्याला वरचेवर घरी येण्यासाठी पत्रे येत होती. पण त्याचा परिणाम नाही झाला बाळाभाऊवर. पण भास्कर मात्र महाराजांना सांगत होता की, हा बाळाभाऊ पेढे खायला सवकला आहे. म्हणून त्याला घरी जायची इच्छा नाही. तुम्ही त्याला चांगला मार द्या. चौदावं रत्नच दाखवा त्याला म्हणजे तो घरी जाईल. एकदा बाळाभाऊ शेगावी परत आल्यावर भास्कर त्याला म्हणाला, का रे इथे सतत वरचेवर येऊन आम्हांला त्रास देतोस तू? बैल कुरण खायला आल्यावर शेतकरी त्याला मारतो तरी पण तो परत येतो. तशीच तुझी वृत्ती झालीये. हे भास्कराचे अहंकाराचे भाषण समर्थांना पटले नाही. त्याचे अज्ञान मिटवण्यासाठी समर्थांनी एक युक्ती केली.

तिथे आलेल्या एका गृहस्थांच्या हाती एक मोठी छत्री होती. ती छत्री घेऊन महाराजांनी बाळाभाऊला जोरजोरात फटके देण्यास सुरवात केली. ते बघून लोक घाबरले. काही पळून गेले. मग ती छत्री मोडल्यावर वेळूची भरीव काठी घेऊन मारु लागले. बाळाभाऊ मात्र समर्थांच्या पुढे तसाच पडला होता. काही लोकांना वाटले, हा मेला पण असेल. भास्कर पण चिंतातुर झाला. पण महाराजांच्या पुढे कोण बोलणार ? वेळूची काठी पण मोडली. मग पायाने तुडवू लागले समर्थ त्याला. जसा कुंभार माती पायाने तुडवतो तसाच प्रकार होता.

बंकटलाल, कृष्णाजी मठात धावून आले, पण समर्थांचा हात धरायला कोणी तयार होईना. भीत-भीत बंकटलाल म्हणाला, महाराज, पुरे झाले हा तुमचाच भक्त आहे. त्याला असे तुडवणे योग्य नाही हो. समर्थ हसून म्हणाले, अरे बंकटा तू असे, असंबद्ध भाषण का करतोस मला समजत नाही. मी नाही त्याला मारले. मी नाही त्याला तुडवले. तू नीट निरखून पाहा. महाराज म्हणाले, तू नीट बघ बंकटा, म्हणजे तुला समजेल. महाराज बाळाभाऊला म्हणाले, बाळा, ऊठ बघु तुझं अंग दाखव म्हणजे लोकांना समजेल. बाळाभाऊ लगेच उठून बसला. पण तेथे कोठेही वळाचे निशाण नव्हते. तो पहिल्याप्रमाणेच आपल्या आनंदात होता. तेव्हा बाळाभाऊची किती दृढ श्रद्धा महाराजांवर आहे हे भास्कराला समजले व त्याला बाळाभाऊचा अधिकार समजला. सगळ्या भक्तांना ह्या प्रकाराचे खूप आश्चर्य वाटले.

सुकलाला आगरवाला म्हणून एक गृहस्थ बाळापुरात राहत होते. त्यांच्याकडे एक गाय होती. ती अत्यंत द्वाड होती. येता-जाता ती लोकांना तुडवत असे. कोणाच्याही शेतात जाऊन काहीही खात असे. वाटेल त्या दुकानात जाऊन हव्या त्या धान्यात तोंड खुपसून ते धान्य खात असे. गाय नाही तर वाघीणच होती. लोक तिच्या त्रासाला

कंटाळून गेलेले. सुकलालाला लोक सांगत, तूच तिला गोळी घाल आणि मारून टाक. एका पठाणाने एकदा गाईला मारण्याचा प्रयत्न केला. पण ते त्या गाईने कसे टिपले काय माहीत तिने जाऊन त्या पठाणालाच उडवले. परगावी पण त्याने गाय नेऊन सोडलेली पण ती परत आली.

गोविंदबुवांचा घोडा शेगावी शहाणा झाला हे सुकलाला अगरवालाला समजले. त्यामुळे त्यानेही लोकांच्या सांगण्यावरून गाईला शेगावी नेण्याचे ठरवले. एका पटांगणामध्ये हळकुंडांचा ढीग केला. सरकी ठेवली शेजारी. गाय ती सरकी खायला येताच फास टाकून दहा-वीस जणांनी, साखळदंडाने बांधून गायीला गाडीत चढविले व शेगावी तिला घेऊन यायला निघाले. आश्चर्य म्हणजे जसजसे शेगाव जवळ येऊ लागले तस-तसे तिच्या स्वभावात फरक पडला. समर्थांच्या पुढे येताच ती अक्षरशः दीनवाणी झाली. महाराज म्हणाले, काय हा तुमचा मूर्खपणा, गाईला असं बांधून आणतात का? अशा यातना तिला देणे बरे नव्हे. पण तिला साखळदंडातून मुक्त करण्यासाठी कोणीही धजेना. शेवटी महाराजांनी स्वतः तिला साखळदंडातून मुक्त केले. समर्थांचे दिव्य चरण ती जिभेने चाटू लागली. सर्वांनी समर्थांचा त्रिवार जयजयकार केला. बाळापूरची मंडळी निघून गेली. गाय मात्र तिथेच राहीली शेगावी मठामध्ये. त्यादिवसापासून त्या गाईने कधीही खोड्या केल्या नाहीत. तिची संतती अजूनही शेगावी नांदते.

कारंज्याचा एक धनसंपन्न लक्ष्मण घुडे नावाचा गृहस्थ होता. अधिकारी होता वाजसनीय शाखेचा. त्याला पोटाचा रोग झालेला. समर्थांची कीर्ती त्याने ऐकली होती. अनेक उपाय करुन थकलेला. सगळे उपाय व्यर्थ गेलेले. महाराजांवर श्रद्धा होती त्याची म्हणून सहपरिवार तो शेगावी आलेला. रोगव्यथेने त्याला चालवत नव्हते.

लक्ष्मणास इतर दोघा-तिघांनी उचलून मठात आणले. नमस्कार करायलासुद्धा त्याचे शरीर असमर्थ होते. त्याच्या कुटुंबाने महाराजांपुढे पदर पसरला. म्हणाली, ''दयाघना! मी आपली धर्मकन्याच आहे. माझ्या पतीच्या यातना हरण करा. अमृताचे दर्शन होता का मृत्यू यावा? माझ्या कुंकवाचे रक्षण करा''. महाराज त्यावेळी आंबा खात होते, तो आंबा त्यांनी लक्ष्मणाच्या बायकोच्या अंगावर फेकला व म्हणाले, ''जा, दे हा आंबा तुझ्या पतीला खायला. तू अगदी पतिव्रता शोभतेस''. महाराज अजून काही बोलले नाहीत व चिलीम ओढू लागले. भास्कर त्यांना म्हणाला, अहो बाई, आता एक क्षणसुद्धा इथे थांबू नका. कारंज्याला जा व आंब्याचा प्रसाद आपल्या नवऱ्याला खायला घाला. कारंज्याला पोहोचल्यावर बाईने नवऱ्याला तो आंबा खायला दिला. गावातील लोकांना सगळी गोष्ट समजली. वैद्यांना पण वार्ता पोहोचली. वैद्य म्हणाले, ''अहो बाई, हे तुम्ही काय कुपथ्य केलेत? सुश्रुत शारंगधरांनीसुद्धा पोटाच्या व्याधीत आंबा कुपथ्य वर्णन केले आहे. तुम्ही तो प्रसाद खायला हवा होता. पत्नीचे पुण्य पतीला उपयोगी पडते''. नातेवाईक घाबरले. जो तो टोचून बोलू लागला लक्ष्मणाच्या बायकोला.

पण इथे घडले वेगळे. पोट साफ होऊन लक्ष्मणाचे पोट अकस्मात मऊ झाले. शौचावाटे व्याधी निघून गेला. लक्ष्मणाची प्रकृती हळू हळू पूर्ववत झाली. जिथे वैद्यशास्त्र काही न करी तिथे उपयोगी पडे खरी कृपा देवसंतांची. लक्ष्मण बरा झाल्यावर मुद्दाम शेगावी आला व त्याने महाराजांचे दर्शन घेतले. महाराज त्याच्या आग्रहाचा मान ठेवून कारंज्यांला गेले. सोबतीला तिथे शंकर-भाऊ-पितांबर होते. लक्ष्मणाने घरी नेऊन पूजा केली महाराजांची. पण पूजेच्या वेळी ऐका ताटात पैसे ठेवले. महाराज म्हणाले ''लक्ष्मणा, असे दांभिकतेचे चाळे करु नकोस. म्हणतोस माझं आता काही नाही. मग हे रुपये कोठून

आणलेस?'' लक्ष्मण काही बोलला नाही. गप्प उभा होता. महाराजांनी आग्रह केला व त्याने खजिन्याच्या पेटीचे दार उघडले. घाबरत-घाबरत महाराजांना म्हणाला, यातील हवे ते घेऊन जा. बहुकप्याचे राजेपण समर्थांना समजले. त्याचा दांभिकपणा समजला. त्याच्या घरातून उपाशीच निघाले महाराज. संत अशा घरी कधीच तृप्त होत नाहीत. खोटेपणाचा राग आला म्हणून महाराज तेथून निघाले. सहा महिन्यांत त्याची लक्ष्मी झाली फस्त. भिक्षा मागण्याची वेळ त्याच्यावर आली म्हणून भक्तांनो परमार्थात कधीही खोटेपणा करु नका.

भक्ती हा मोक्षाचा मार्ग असतो. ती हृदयापासून करा. अशाप्रकारे श्रीगजानन विजयग्रंथ कथासाराचा दहावा अध्याय समाप्त झाला.



# श्रीगजानन विजय कथासार - अध्याय ११वा

श्रीगणेशाय नमः । परमेश्वराची रुपे अनेक आहेत. पण तत्त्व मात्र एक आहे. ज्याला जे तत्त्व भावते त्या तत्त्वाची आराधना लोक करतात. शैव त्याला शिव म्हणतात. वेदअभ्यासक त्याला ब्रम्ह म्हणतात. वेगवेगळा हविर्भाव तुला अर्पण करतात. तूच त्र्यंबकेश्वर गोदावरीच्या तटी. तूच गोकर्णरुपी शिवशंकर घृष्णेश्वर वेरुळात. तू महादेव शिंगणापुरी. त्या सर्वांना साष्टांग नमन करुन ह्या अध्यायाच्या कथासाराला सुरुवात करुया.

दुसऱ्या वर्षी दासनवमीसाठी खास महाराज बाळकृष्णाच्या सदनी आले. महाराजांबरोबर भास्कर, बाळाभाऊ, पितांबर, गणू, जगदेव व दिंडोकार होते. सुरेख दासनवमीचा उत्सव बाळापुरामध्ये पार पडला. जेव्हा दासनवमीचा उत्सव संपला तेव्हाच भास्कराचा दैवयोग चालून आला. एक पिसाळलेले कुत्रे येऊन नेमके भास्कराला चावले. सर्व म्हणाले की, हा आता पिसाळेल. लोक म्हणाले, डॉक्टरांना बोलवा. पण भास्कर म्हणाला, ''मला वैद्याची गरज नाही. माझा वैद्य हा गजानन. त्यांच्याकडेच मला न्या. ते सांगतील तसे करुया''. गजानन महाराजांच्या समोर भास्कराला आणले. महाराज हसून म्हणाले, ''भास्करा हत्या, वैर आणि ऋण कुणास चुकले नाहीत. तुझा जीव वाचवू का? हे कुत्रं नुसतं निमित्त ठरलं. तुझे आयुष्यच मुळी आता सरले''. भास्कर म्हणाला, मी आहे अजाण. तुमचे मी लेकरु आहे. तुम्ही ज्ञानाचा सागर आहात. तुम्ही योग्य ते जाणता. महाराज म्हणाले, संचित, प्रारब्ध, क्रियमाण हे भोगल्यावाचून या बुद्धीजीवाची सुटका होणे नाही. पूर्वजन्माचं उर्वरित आता तुझं काही नाही भास्करा. हा कुत्रा तुझा पूर्वजन्मीचा वैरी होता म्हणून तो तुला आत्ता चावला. भास्करा, आता मी इतकं करतो की,

श्वानविषापासून तुला पिसाळू देत नाही. अजून २ महिने तुझं आयुष्य भोग भोगण्यासाठी बाकी आहे. आता जरी मृत पावलास तरीसुद्धा तुला परत २ महिन्यांसाठी जन्म घ्यावा लागेल. लोक भास्कराला म्हणाले, भास्करा, तू धन्य आहेस. इतकी संतसेवा केलीस की तुझे जन्म मरण चुकले. सर्व मंडळी बाळापुराहून शेगावी परतली. भास्कर शेगावी प्रत्येकाला सांगे की महाराजांना सांभाळा. महाराजांच्या कीर्तीचा ठेवा असाच टिकवा. भास्कराने एकदा मठामध्ये बंकट, हरी पाटील, साहुकार अशा अनेक मंडळींना बोलावले व मनामधील इच्छा बोलून दाखवली. ह्या शेगावी महाराजांचे भव्य स्मारक व्हावे अशी माझी इच्छा आहे. तुम्ही हे करतो म्हणा म्हणजे मी निःशंकपणे वैंकुंठासी गमन करेन. अशी आज इथे तुम्ही शपथ घ्या. सर्वांनी ते कबूल केले. भास्कराच्या मनात जी रुखरुख होती ती पूर्ण संपली. उत्तरोत्तर त्याची आनंदी वृत्ती वाढत होती.

माघ वद्य त्रयोदशीला महाराज म्हणाले भास्करास की आज त्र्यंबकेश्वराला जाऊ. तो त्र्यंबकराज कर्पूरगौर जो भवभयांतक भवानीवर जो झाला आहे स्थिर. जो पातकांचा संहार करतो. तिथे ब्रम्हगिरी पर्वतावर विविध औषधी वनस्पती आहेत. ज्याचा उपयोग आपण श्वानविषावर करु शकतो. चल जाऊन बघूया तर. भास्कर म्हणाला, गुरुराया, आता औषध कशाला. तुमच्या कृपेने माझ्या शरीरातील विष बाळापुरातच शांत झाले. आता आयुष्याचे अवघे दोन महिने उरले आहेत. तुम्हीच आमच्यासाठी त्र्यंबकेश्वर, गोदावरी. तुमचे चरण तेथेच करेन मी स्नान. समर्थ हसून म्हणाले, तू जे म्हणतोस ते सत्य तरी तीर्थमहिमा वेगळा असतो. चल उशीर नको करुस. त्र्यंबकेश्वराचे दर्शन घेऊ. बाळाभाऊ, पितांबर हे पण त्यांच्याबरोबर निघाले. शेगावाहूननिघून शिवरात्रीला त्र्यंबकेश्वरी पोहोचले. कुशावर्ती स्नान केले घेतले हराचे दर्शन. गोमतीची पूजा

केली. तिथून ते नाशिकला गोपाळदास ह्यांना भेटायला आले. गोपाळदासांना खूप आनंद झाला. ते मंडळींना म्हणाले आज माझा भाऊ भेटायला आला. नारळ-खडीसाखर असा प्रसाद भास्कराला लोकांना वाटायला सांगितला. धुमाळ वकिलांच्या घरी महाराज गेले. तिथे काही दिवस राहून महाराज शेगावी परत आले.

महाराज शेगावी आल्यावर अडगावहून इ्यामसिंग आलेला. महाराजांना शेगावहून अडगावी नेण्यासाठी. महाराज त्याला म्हणाले, आत्ता आग्रह करु नकोस. रामनवमी झाल्यावर येऊ आम्ही. आता तू परत जा. हा झ्यामसिंग समर्थांचा निस्सीम भक्त होता. आला तसा परत गेला, पण आठवणीने परत आला रामनवमीला. उत्सव शेगावात साजरा करून महाराजांना शिष्यांसह घेऊन तो अडगावासी परत आला हनुमान जयंतीच्या निमित्ताने.

समर्थ अडगावात आल्यावर अनेक चमत्कार झाले. एके दिवशी महाराजांनी भास्कराला फुफाट्यात लोळवले. त्याच्या छातीवर बसून ताडन केले. लोक दुरुन पाहत होते. पण जवळ कोणी जाईना. बाळाभाऊ जवळच बसलेला. तो म्हणाला, ''सद्‌गुरुनाथा, अहो आता भास्कराला सोडा तो बेजार झाला आहे''. आपले दोन्ही कर जोडून भास्कर म्हणाला, ''नका विनवू त्यांना. ते माझे साक्षात ईश्वर. त्यांना काय करायचं आहे ते करु दे. लोकांना वाटत असतील दुरुन चापट्या, पण मला वाटतं त्या गुदगुल्या आहेत''.

भास्कराला घेऊन अडगावातील बिऱ्हाडात महाराज आले. बाळाभाऊला म्हणाले, आता भास्कराचे अवघे दोन दिवस उरले. पंचमीला जाईल तो. आज मी हे जे ताडनाचे कृत्य केले ते तुला कळले का? भास्कराने तुला माझ्याकरवी छत्रीचा मार दिला होता. त्याचे क्रियमाण नष्ट करण्यासाठी मी आज त्याला ताडिले. दुसरा माझा काही हेतू नाही.

उत्सवाचा काला झाला. मग माघ वद्य पंचमीचा दिवस उगवला. दिवसाचा एक प्रहर झाला. समर्थ भास्कराला म्हणाले, भास्करा, तुझे आज प्रयाण आहे. पद्मासन घालून पूर्वाभिमुख बस. चित्त स्थिर ठेव. लोक विठ्ठल विठ्ठल नारायण असा गजर करत होते. भास्कराने पद्मासन घातले. नासाग्री दृष्टी ठेवून वृत्ती लीन केली. भजन झालं एक प्रहर. मध्यान्ही आले दिनकर तेव्हा महाराजांनी हरहर असा शब्द केला मोठ्याने, तसा भास्कराचा प्राण वैकुंठासी गेला.

लोकांनी महाराजांना विचारले, भास्कराला कुठे ठेवावे. द्वारकेश्वर पशुपती त्याच्या जवळी सती. तेथे ठेवा भास्कराला. तशी आज्ञा मिळाल्यावर लोकांनी विमान बांधिले केळीचे खांब चहुबाजूस लावूनी. सांगविधी भास्कराच्या समाधीचा पूर्ण झाला. लोक म्हणू लागले, महाराजांचा परमभक्त गेला.

दुसऱ्या दिवशीपासूनच समाधीच्या जवळ होऊ लागले अन्न दान. द्वारकेश्वराचे स्थान हे अडगावाच्या जवळ सुमारे एक मैल अंतरावर होते. ते रमणीय स्थान होते. आम्र, वट, औदुबर असे वृक्ष होते. चिंचवृक्ष विशेष होते. अडगाव-अकोल्याच्या मध्यंतरी समाधीस्थान दिले भास्कराला.

१० दिवस अन्नदान गोरगरिबांसाठी सुरू होते. संत भंडारा नाव ज्याचे लोक जेवायला बसल्यावर मात्र कावळे काव काव करून त्रास देत होते. लोक त्रासून गेलेले. कावळ्यांना हाकलू लागले. लोकांनी भिल्लांना बोलवून त्यांना मारायला बाणही तयार केले. तेव्हा गजानन म्हणाले, त्यांना नका मारु. ते भास्कराच्या भंडाऱ्याचा प्रसाद घ्यायला आले आहेत. भास्कर लगेच वैकुंठावरी गेला. पितृलोकावर नाही राहिला. दहा दिवस प्राण अंतरिक्षात राहतो. सपिंडी श्राद्ध झाले की पुढे जातो. बलिदानाचे कार्य भास्कराच्या बाबतीत मुळी उरले नाही. म्हणून त्या कावळ्यांचे पित्त खवळले. भास्कराचा आत्मा मुक्त झाला

आहे. मी त्या कावळ्यांना सांगतो. जिवांनो, ऐका तुम्ही, उद्यापासून तुम्ही हे स्थान वर्ज्य करा. उद्यापासून इथे येऊ नका. आज पूर्ण प्रसादाचा लाभ घ्या. पक्ष्यांनी पण महाराजांच्या आज्ञेचे पालन केले. कुत्सीतांनी ह्या वेळी पण टीका केली. पण दुसऱ्या दिवशी जेव्हा एकही कावळा दिसला नाही तेव्हा मात्र गप्प बसले. समर्थांसी शरण आल्याने बारा वर्षे कावळे तिथे फिरकले नाहीत.

चौदा दिवस झाल्यावर महाराज आपल्या शिष्यांसह शेगावी परत आले. त्यावेळी शेगावात एक गोष्ट घडली. शेगावात विहीर खणण्याचे काम चालू होते. त्यावर्षी खूप दुष्काळ पडलेला. दोन पुरुष मावतील इतकी विहिर खोल गेलेली तेव्हा तिथे मोठा काळा खडक लागला. तो फोडण्यासाठी सुरुंग लागणार होता. चारी बाजूला भोके पाडली. दोऱ्यांच्या साहाय्याने एरंडपुंगळ्या पेटवून सोडल्या. त्या मध्येच दोऱ्याच्या गाठीवर अडकून पडल्या. पुंगळी खाली जाईना, दारुस विस्तव लागेना. मिस्तरीने गणू जवण्याला सांगितले की जरा पुंगळ्या पुढे सरकव नाहीतर सुरुंग वाया जाईल. मिस्तरी जरा रागावला गणूला, बिचारा गरीब होता. ह्या कामावरच घर चाले म्हणून समर्थांचे नाव घेऊन गणू आत विहिरीमध्ये उतरला. एक पुंगळी पुढे सरकवली ती तात्काळ आत गेली. दुसरी पुंगळी सरकवायच्या आत दुसरा सुरुंग उडला. गणू विहिरीतून म्हणे, समर्था, धावून ये माझे रक्षण करायला. विहिरीत धुराचा डोंब झाला होता. एक मोठी कपार गणूच्या हाती लागलेली त्यात तो बसलेला. लोक आत गणूला शोधत होते. गणू कुठेही दिसेना. कुठेतरी त्याचे प्रेत पडलेले असेल म्हणून लोक म्हणाले की त्याला शोधायला हवे. गणू आतून म्हणाला, अहो मिस्त्री मी जिवंत आहे. कपारीच्या तोंडी मोठा धोंडा पडला म्हणून माझे प्राण वाचले. ५ ते १० जणांनी मिळून त्याला बाहेर काढले.

बाहेर आल्या आल्या गणू मठात गेला स्वामींचे दर्शन घ्यायला. त्याला बघताच महाराज म्हणाले की, किती धोंडे उडवलेस? पुन्हा

असे साहस नको. पुंगळी सुटल्यावर कधीही हाताने धरण्याचा प्रयत्न करु नये. तुझे गंडांतर आज निमाले साचार. गणू म्हणाला, महाराज सुरुंग पेटल्यावर तुम्हीच मला हात देऊन कपारीत बसवलेत. म्हणून तुम्हीच माझे रक्षण केलेत. गजानन कृपेचा महिमा असाच थोर आहे !



# श्रीगजानन विजय कथासार - अध्याय १२वा

महाराज तर चिंतामणी म्हणजे मनातील जाणणारे आहेत. भक्ताच्या मनाची अवस्था त्यांच्यापासून लपून राहील का? बच्चुलाल अग्रवाल, अकोल्याचा धनसंपन्न होता. मनानेसुद्धा तो उदार होता त्याच्या कानावर लक्ष्मणपंत जे कारंज्याचे होते त्यांची हकिकत समजल्यावर नक्की महाराजांच्या कृपेने असे घडले का हे पडताळायला पाहिजे असा विचार तो मनी करत होता.

असेच एकदा महाराज अकोल्याला आले आणि बच्चुलालाच्या घरी येऊन त्याच्या ओट्यावर बसले. ते बघताच बच्चुलालाला समजले की, महाराज नक्कीच साक्षात्कारी आहेत. आपण कधीच ह्या शंका घ्यायला नको. त्याला ह्या विचाराने खूप आनंद झाला की महाराज आपल्या घरी आलेत. तो महाराजांना म्हणाला, महाराज, मला खूप आनंद झाला आहे आपल्या येण्याने. आपली पूजा करावीशी वाटत आहे. असं ऐकताच महाराजांनी आनंदाने मान डोलावली.

बच्चुलालाने लगेचच षोडशोपचार पूजेची छान तयारी केली. प्रथम मंगलस्नान घातले. नानाविध उटणी लावून मग वस्त्र परिधान करण्यासाठी जरीचा पितांबर नेसवला. शालजोडी अर्पण केली. काश्मिरी जरीचा एक रुमाल अर्पण केला. गोफ घातला गळ्यात, सलकडी घातली हातात. हाताच्या दाही बोटांमध्ये अंगठ्या घातला. बहुमोल हिऱ्याची वाकी घातली. रत्नजडित सुरेख कंठी महाराजांना घातली. नैवेद्यासाठी तर जिलबी, राघवदास लाडू, पेढे अगदी जय्यत तयारी. त्रयोदशगुणी विडे एका तबकात पुढे ठेवले महाराजांच्या. अष्टगंध, सुवसिक अर्गजा अत्तरे अंगभर लावली. गुलाबपाणी शिंपडले. सुवर्णाच्या ताटात शेवटी दक्षिणा ठेवली. रुपये होन मोहरांची अशी खूप मोठी दक्षिणा होती. मोजल्यास दहा हजार एवढी रक्कम नक्कीच होईल. महाराजांना म्हणाला, महाराज, ह्या ओट्यावरती

मला एक राममंदिर बांधायचे आहे. ते माझे मनोरथ पूर्ण कराना आणि गजाननाच्या चरणांवर डोकं ठेवून नमस्कार केला.

महाराज म्हणाले, अरे पण आज मला काय केलंस हे तू? मी काय बैलपोळ्याचा बैल आहे? की दसऱ्याचा घोडा? तो जानकीजीवन तुझी इच्छा पूर्ण करेल. पण मला ह्या दागिन्यांचा काय उपयोग? अरे हे सर्व विष आहे. मला नको त्याचा स्पर्शसुद्धा. तू किती मोठा श्रीमंत आहेस हे दाखवायला केलेस का हे प्रदर्शन, सांग मला बच्चुलाला? हे सगळे लखलाभ तुलाच शोभतात. तुम्हा प्रापंचिकांना ह्या सर्व गोष्टीचे लाभ. मी तर सगळीकडे नागवा फिरतो. मी आहे संन्यासी. माझा यजमान तर उभा विटेवरी. तो नाही का देणार मला हे वैभव? असं म्हणून महाराजांनी अंगावरील सर्व दागिने काढून चहूबाजूला फेकले. दोन पेढे खाऊन निघून गेले. हा प्रकार बघून लोकांना वाईट वाटले.

तिथे काही कारंज्याचे लोक हजर होते ते म्हणाले, आमचा लक्ष्मण घुडे हा अभागी आहे. त्याने पण बच्चुलालाप्रमाणे पूजा केली. पण मनामध्ये त्याने धनाचा मोह धरलेला. दांभिकाची सेवा कशी स्वीकारणार भगवंत? शर्कराखंड म्हणून समोर कुचका दाणा ठेवला. त्याचे फलही लक्ष्मणाला तसेच मिळाले. ह्या कृतीने वाटोळे झाले त्याचे. पण बच्चुलालाने मनापासून पूजा केलेली. त्याच्यावर संतकृपा झाली. ज्याच्यावर भगवंताची कृपा असते तो सदा सुखीच राहतो.

समर्थांचा एक पितांबर नावाचा शिष्य होता. पितांबर शिंपी जातीचा. पितांबराने फाटके धोतर नेसलेले व तो मठामध्ये वावरत होता. तेव्हा महाराज त्याला म्हणाले, अरे पितांबर, असे फाटके धोतर का नेसतोस, तुझा पृष्ठभाग दिसतोय तो तरी झाकला गेला पाहिजे ना? नाव पितांबर आणि धोतर मात्र फाटके. हे म्हणजे असं झालं की नाव सोनुबाई आणि हातामध्ये कथिलाचा वाळा पण नाही? हा घे मी दुपेटा देतो तुला तो नेस. पितांबर महाराजांनी दिलेला दपेटा नेसला हे असह्य झाले इतरांना. काही शिष्य मंडळी पितांबराला टोचून बोलू

लागली. समर्थांच्या उपयोगी असे वस्त्र तू का परिधान केले आहेस रे ? जे वस्त्र समर्थांच्या उपयोगी आहे ते तू का नेसलेस ? कळली हो तुझी भक्ती. आता तू अजिबात इथे राहू नकोस समर्थांचा अपमान करायला. पितांबर म्हणाला की, नाही हो, उलट महाराजांनीच मला हा पीतांबर नेसायला दिला. मी उलट गुरुंचा मान ठेवला. त्यांची आज्ञा एकून. शिष्यांमध्ये तेढ निर्माण झालेली. ती मिटवण्यासाठी समर्थ पितांबरास म्हणाले, अरे पितांबरा, आता तू इथून जा बाळा, जाणते झाल्यावर घरट्यातून पिल्लू उडून जाऊन आकाशी कशी उंच भरारी घेते तशी तू घे. माझी अखंड कृपा तुझ्यावर कायम राहील. पितांबराच्या डोळ्यात पाणी आले. महाराजांना साष्टांग नमन करुन तो पाठी वळून न बघता मार्गस्थ झाला. गुरुचा शब्द हा प्रमाण मानावा ह्यासाठी हे किती थोर उदाहरण आहे.

पितांबर त्यानंतर कोंडोलीला आला. वनात एक आंब्याचे झाड होते, त्याच्या सावलीशी बसला. मनामध्ये सतत गजाननाचे स्मरण आणि चिंतन चालू होते. रात्रभर तिथे बसला व सकाळी फांद्यांवर जाऊन बसला आंब्याच्या झाडावर खूप मुंगळे होते. त्यामुळे कुठे बसावे ते पितांबराला कळत नव्हते. एक मनुष्य झाडाच्या फांद्यांवर असा माकडासारखा फिरतोय हे पाहून गुराख्यांना खूप कौतुक वाटले. ते एकमेकांना सांगत होते की आंब्यांच्या झाडाच्या फांद्यांवरुन हा फिरुन आला, पण पडला नाही खाली. गजानन महाराजांच्या शिष्यांमध्ये असे सामर्थ्य असते. कदाचित हा त्यांचाच शिष्य असेल. चला आपण गावात जाऊन सगळ्यांना सांगु आंब्याच्या झाडाजवळ लोक जमा झाले. नक्की कोण आलंय हे बघायला. बघून लोक म्हणायला लागले की, अरे हा तर लहान मुलगा आहे. ढोंगी असावा हा. महाराजांचा थोर शिष्य जो भास्कर पाटील होता त्याचा नुकताच अडगाव नामे गावात अंत झाला. समर्थांचा शिष्य इथे कशाला येईल ? परत एकदा विचारुन बघुया ह्याला. मग खरे खोटे ठरवूया. उगीच तर्क नकोत. एक माणूस पुढे झाला. पितांबराला त्याने विचारले तुम्ही

कोठून आलात? तुमचे गुरु कोण? पितांबर म्हणाला, मी शेगावीचा राहणारा व गजानन महाराज हे माझे गुरु. माझे नाव शिंपी पितांबर. त्यांना आज्ञा केली म्हणूनच मी शेगाव सोडून इथे येऊन राहू लागलो. आंब्याच्या मुळाशी खूप मुंगळे होते, म्हणून मी फांदीवरी येऊन बसलो.

लोक उगीचच रागवारागवी करु लागले. पितांबरासी म्हणाले, उगीच चेष्टा करु नकोस. काय म्हणे तर मी राजाची आवडती राणी. खळगी पोटाची भरण्यासाठी तुम्ही आला आहात ते सांगा. श्यामराव देशमुख त्या गावाचे पितांबराला सोंगाड्या म्हणाले व ते म्हणाले की अरे स्वामी समर्थ गजानन हे प्रत्यक्ष परमेश्वर आहेत. त्यांच्या नावाला उगीच बट्टा लावू नको. महाराजांनी एकदा ऋतू नसताना आंब्याच्या झाडाला फळे आणली होती. त्यांनी फळे आणली, पण तू ह्या जीर्ण वृक्षाला नुसती पाने आण, तर तुला मानू नाहीतर तुझी धडगत नाही. बळीराम पाटील ह्यांचा वठलेला आम्रवृक्ष आहे तो पर्णयुक्त कर. आमच्यासमोर हे तू कर नाहीतर सगळ्यांचा मार खाशील.

हे ऐकून पितांबर घाबरला. बोलला, असं नका करु. माझी पूर्ण कथा ऐका. एकाच खाणीत हिरे आणि गारा एकत्र असतात. तसाच मी गारा आहे. मी अजिबात खोटे सांगत नाही.

श्यामराव म्हणाले, अरे मग आता नुसती बडबड नको करुस, तू तुझ्या सद्‌गुरुंचा धावा कर ना, त्यांच्या प्रभावाने का होईना, झाडाला पाने येतील. पितांबराला मनातून इथे आड तर तिथे विहीर आहे असे वाटू लागले.

पितांबराने हात जोडले. डोळे मिटून महाराजांचे त्याने स्मरण केले. मुखाने तो महाराजांचे स्तवन करू लागला. महाराज, गुरुराया आता माझा भिस्त फक्त तुमच्यावर आहे. नारायण जसा प्रल्हादासाठी धावून आला त्याच्या हाकेला तशीच माझी लाज आज महाराज तुम्ही ठेवा. तुमचा शिष्य तुम्हांला शरण आला आहे. गावातील सर्व मंडळी

त्या वठलेल्या वृक्षाजवळ पितांबर काय करतो हे बघण्यासाठी जमली होती. तो म्हणाल, स्वामी माझ्यामुळे तुम्हांला दोष लागू नये. तुमच्या वचनासाठीच ह्या वठलेल्या आम्रवृक्षाला पालवी आणा. तू पुष्प आहेस तर मी सूत. तू कस्तुरी तर मी माती हे आहे सत्य. लोक मला गजाननाचा शिष्य म्हणतात. जे काही आहे श्रेय ते तुझे माझे काही नाही. तुमच्या सांगण्यावरुन मी इथे आलो आहे. आता मला ह्या संकटातून मुक्त करा. गुरुराया, माझा अंत पाहू नका. धावून या !

पितांबरासह सर्व गावकरी गजाननाचा गजर करु लागले आणि काय आश्चर्य पालवी फुटली वृक्षाला. स्वप्नात आहोत का सत्यात हे लोकांना समजेना. फांदीतून शुभ्र असा चीक बाहेर आला. वठलेल्या वृक्षाला पूर्ण पालवी फुटली. सर्वांची खात्री पूर्ण पटली. गजाननाचा शिष्य म्हणून पितांबराला सर्व गावकरी कोंडीली गावाला घेऊन गेले. मिरवणूक काढली. भव्य स्वागत केले. कोंडोलीतील लोकांचा उद्धार करण्यासाठीच महाराजांनी पितांबराला कोंडोलीला पाठवले होते. पितांबराचा मठही झाला कोंडोलीत व तिथेच त्याचा अंतही झाला. एक दिवस महाराज उद्विग्न चित्त होऊन एकाच ठिकाणी बसलेले. शिष्य विचारू लागले, काय झाले ? महाराज म्हणाले आमुचा कृष्णा पाटील गेला, जो आम्हाला चिकणा सुपारी द्यायचा आणून. त्याची आठवण झाली. त्याचा मुलगा राम मोठा झाल्यावर देईल की नाही काय माहीत ? म्हणून मला असं वाटतं ह्या मठात मी न राहावं. भक्त चिंतीत झाले. सर्वांनी, महाराजांचे आपण चरण धरुन विनवूया असा विचार केला. बंकटलाल, मारुती सर्वांनी तसे केले. महाराज तुम्ही शेगाव सोडू नका. महाराज, इच्छा तुमची जिथे असेल तिथे राहा. पण शेगाव सोडून जाऊ नका.

महाराज म्हणाले, तुमच्या गावात एकी नसून दुफळी माजलेली आहे. जी कोणाचीच जागा नसेल अशी जागा मला द्या. अशी हकिकत ऐकून सर्व मंडळी चिंतेत पडली. बंकटलाल म्हणाला महाराज, असे संकट नका हो घालू. सरकार देईल का अशा धार्मिक

कृत्याला जागा. अहो हे राज्य परक्यांचे आहे. म्हणून आम्हां कोणाचीही जागा घ्या मागून. आमची तयारी आहे त्याला. समर्थ म्हणाले, हे काय तुमचे अज्ञान. सच्चिदानंदाची ही सारी सृष्टी कित्येक राजे इथवर ह्या भूमीवर होऊन गेले. मग कशी ही सरकारची जागा? त्याचे नको भूषण. तुम्ही पूर्ण प्रयत्न तर करा. जागा मिळेल. पुढे आता काही बोलू नका. हरी पाटलाच्या हाताला नक्की यश येईल.

सर्व मंडळी हरी पाटीलाकडे आली. त्याच्या सल्ल्याने एका जमिनीचा अर्ज केला पूर्ण. बुलढाण्याचा सर्वाधिकारी असलेला साहेब नामेकरी होत. त्याने अर्जावरुन एक एकर जागा दिली व म्हणाला, आत्ता एक एकर जागा दिली आहे, तुम्ही दोन एकर मागितली होती. तुम्हांला नंतर अजून एक एकर जागा देईन. आधी ही जागा करा व्यवस्थित. सरकारचा असा ठराव दफ्तरी नमूद आहे.

बंकटलाल, हरी पाटील हे पुढाकार घेऊन वर्गणी जमवत होते. द्रव्यनिधी क्षणात जमला आणि काम पण सुरू झाले. सत्पुरुषाचा हेतू पुरवण्यासाठी देव पण आतुर असतो. विठू पाटील डोंगरगावचे, लक्ष्मण पाटील वाडेगावचे, जगुआबा शेगावचे हे पुढारी होते वर्गणीचे. अशा प्रकारे श्रीदासगणू विरचीत श्रीगजानन विजय ग्रंथ कथासाराचा बारावा अध्याय इथे पूर्ण होतो.



# श्रीगजानन विजय कथासार - अध्याय १३वा

गजानना, तुझ्या कृपेने माझ्या विचारांमधील मलिनता दूर कर. मला निर्भय कर. मी तुझी अजाण भक्त आहे. जरी घार कुठेही फिरत असली तरी तिचे चित्त पिल्लांपाशीच असते, तसं तुझ्या सर्व भक्तांवर लक्ष ठेव कायम. तू आहेस चिंतामणी. मनातलं जाणतोस सर्व काही, आता मनामधील चिंता हरुन टाका. तुमच्या कृपाकटाक्षाने. श्रोत्यांनो बंकट, हरी, लक्ष्मण, विठू, जगदेवादी वर्गणी जमवण्यासाठी खूप मेहनत घेत होते. भाविकांनी मनोभावे वर्गणी दिली. पण कुत्सितांनी हेटाळणी केली की मठासाठी वर्गणी कशाला. तुमचे महाराज कुबेराचं भांडार आहेत ना, मग आता कशाला वर्गणी गोळा करताय, हे भाषण ऐकता जगदेव हसून म्हणाले, ह्या भिक्षेचे कारण तुमच्यासाठीच चांगले आहे. ह्यातून तुमचे कल्याण व्हावे हीच इच्छा आहे. सूर्याच्या तेजस्वी प्रकाशाला कधी दिव्यांची गरज लागते का? रोगाचे भय शरीराला असते, प्राणासाठी नसते. जन्म-मरण हे प्राणाला नसते. संप्पनता हे तुमचे शरीर. रोग त्याचे अनाचार. त्याचा नाश होणार ह्या पुण्यरुप औषधीने. म्हणून पुण्याचा संचय करा. कुतर्क मनी धरु नका. बीज जर तुम्ही खडकावर पेरले तर त्याला मोड येईल का? अनाचार, दुर्वासना हे खडकाप्रमाणे आहेत. त्यांच्यावर दाणा टाकला तर त्याचे भक्षण किडे पाखरे करतात. संतसेवेसारखे पुण्य नाही. संतकार्याला आपण काही मदत केली तर त्याचा आपल्याला फायदा होतो. एक दाणा पेरला की एका कणसाच्या निर्मितीत अनेक दाणे येतात. असं सगळं ऐकून कुटाळ निरुत्तर झाले. मिळालेल्या जागेवर मठ बांधला सत्वर. गावातले सर्व लोक त्यासाठी खूप भक्तिभावाने व श्रद्धेने काम करत होते.

समर्थ त्या वेळी जुन्या मठावर राहत होते. समर्थांनी पण येऊन कामाचे कौतुक करावे असे लोकांना वाटले म्हणून तेव्हा शेगावहून रेतीच्या गाड्या जात असत एका रेतीच्या गाडीवर समर्थांची स्वारी बसली त्यांतील तो गाडीवान समर्थांना बघताच दूर झाला. कारण तो जातीने महार होता. महाराज म्हणाले त्याला की, खाली का उतरलास ? आंम्हाला कुठल्याही विटाळाची बाधा होत नसते.

महार त्यावरी म्हणाला, महाराज, मी तुमच्या बाजूला गाडीवर नाही असणार. रामाचा भक्त मारुती, पण तो त्याच्या बाजूला नाही बसला कधी. तो दोन्ही हात जोडून कायम रामाचा दास झाला. बरं, तुझी मर्जी, असं महाराज म्हणाले. ते म्हणाले, बैलांनो नीट चला गाडीवाल्यामागून. बैल तसेच चालले आणि योग्य स्थळी पोहोचले. समर्थ खाली उतरले. मध्यभागी येऊन बसले. हल्ली तेथेच समर्थांच्या भव्य समाधीचे काम झाले आहे.

महाराज जिथे बसले तिथेच 'मध्य' केला. एक एकराचा हूकुम झाला, पण बांधकामाच्या वेळेला समाधिमध्याची जागा थोडी कमी पडली. त्यासाठी अकरा गुंठे जागा अधिक घेऊन तिथे बांधकाम सुरू केले. अकरा गुंठे जागेचा तपास करण्यासाठी जोशी नावाचा अधिकारी आलेला.

हसत-हसत समर्थांनी पाटलाला शब्द दिला, जागेबद्दल तुमचा दंड माफ होईल. जोशी अधिकाऱ्याला समर्थांनी स्फूर्ती दिली चाललेल्या प्रकरणावर त्यांनी शेरा दिला की हा दंड विनाकारण आहे. गजानन संस्थेला दंड परत द्या असा शेरा दिला. मी शेगावी जाऊन या घडलेल्या प्रकरणाची चौकशी केली आहे. त्यांना दंड होणे उचित नाही. माफ करा असा हूकुम दिला. हरी पाटलाला ह्याचा आनंद विशेष झाला. समर्थांचे वाक्य कधीही खोटे ठरणार नाही. माझ्यावर पण

महाराचे असेच विटाळ येऊन गेले असं पाटील म्हणाले. त्यावेळी महाराज मला म्हणाले की, भिऊ नकोस, तुझ्या केसालाही धक्का लागू देणार नाही. तसाच प्रकार आज झाला. समर्थवाक्य खोटे झाले असे कोणी कधी ऐकले.

नवीन जागेत आल्यावर काय-काय चमत्कार झाले किंवा भक्तांना काय-काय अनुभव आले त्यांचे वर्णन ऐकूया.

सवडद नावाचे एक गाव होते. तिथून एक गंगाभारती नावाचा गोसावी शेगावी दर्शनाला आलेला. त्याला महारोग झालेला. सर्व अंग त्याचे कुजून गेलेले. म्हणून तो खूप त्रासलेला. लाल-लाल असं अंग झालेलं. बोटे झडलेली. कानाची पाळी सुजलेली. अंगाला सतत खाज सुटायची. समर्थांचा नावलौकिक ऐकून तो शेगावी आला. पण लोक त्याला तू रक्तपिती आहेस असं म्हणून अडवू लागले दर्शन घ्यायला. तू लांबूनच महाराजांचे दर्शन घे. अरे हा स्पर्शजन्य रोग आहे ह्याचा तू विचार कर.

पण ऐके दिवशी सगळ्या लोकांची नजर चुकवून गंगाभारती महाराजांचे प्रत्यक्ष दर्शन घ्यायला गेला. त्याने महाराजांच्या पायावर डोकं ठेवलं, डोक ठेवताच महाराजांनी त्याच्या डोक्यावर चापट मारली. त्याला एकदम जोरात लागलं म्हणून तो पटकन उठून उभा राहिला आणि महाराजांकडे नीट बघू लागला. तर समर्थांनी दोन्ही हातांनी त्याच्या थोबाडीत मारली. फडाफड मुखात मारिले. वरती अजून एक लाथ पण मारली आणि घसा खाकरुन बेडका आला मुखात तो त्याच्या अंगावर थुंकले. पण भक्तीमध्ये इतका विश्वास असतो ह्याचेच उदाहरण हे की गंगाभारतीने त्यास प्रसाद मानिले. त्याने त्या बेडक्याला सर्वांगावर चोळले. तो तिथे एक कुटाळ उभाच होता तो लगेच म्हणाला, आधीच शरीर तुझे कुजलेले. त्यात ज्यांच्यावर श्रद्धा

ठेवून तू आलास ते तुझ्या अंगावर थुंकले. तो बेडका तू साबणासारखा अंगाला चोळलास. हे एक अंधश्रद्धेचे उदाहरण आहे. ह्याने समाज रसातळाला जातो. तू औषध वैद्याचे घेणे सोडून हे काय करतोयस ?

गोसावी त्याचे बोलणे ऐकून हसू लागला. म्हणाला, इथेच चुकता तुम्ही. अहो महाराजांपाशी काही अशक्य नाही. तुम्हांला हा बेडका वाटला, पण माझ्यासाठी हे मलम आहे. ह्याला अजिबात दुर्गंध नाही. उलटकस्तुरी समान सुगंध आहे. तुला त्याचे प्रत्यंतर बघायचे असेल तर चल माझ्याबरोबर, स्नानस्थानी. समर्थ रोज स्नान करायचे त्या स्थानी दोघे गेले. त्या स्थानाची माती गोसाव्याने सर्वांगाला लावली. जिला सुगंध येत होता. ते पाहून कुटाळ मनी घोटाळला. मनीच्या कुत्सित कल्पना सोडून समर्थांना शरण गेला. कोणी गंगाभारतीला जवळ बसून देत नसे पण गंगाभारतीचा आवाज सुमधुर होता. गायनाचा त्याचा अभ्यास होता. असा नेम गंगाभारतीचा १५ दिवस चालू होता. रोगाचे स्वरुप पालटले. त्याचे शरीर पूर्ववत झाले. अंगाची खाज कमी झाली. हातापायांच्या भेगा निमाल्या. अंगाला येणारी दुर्गंधी पूर्ण नाहीशी झाली. गोसाव्याचे भजन ऐकून समर्थ संतुष्ट झाले. त्यानंतर गंगाभारतीची पत्नी अनसूया शेगावी आपल्या मुलासह आली. आपल्या पतीला न्यायला. म्हणाली, स्वामी, आता तुमचा व्याधी बरी झाली आहे तर चला आता घरी, गंगाभारती पत्नीला व मुलाला म्हणाला, आता मला सवडदला येणे शक्य नाही. माझे चित्त आता संसारात रमणार नाही. मी आता इथे राहून कायम गजाननाची सेवा करणार. तो संतोष भारतीला म्हणाला की, तू तुझ्या मातेला कधीही अंतर देऊ नकोस. मी सवडदला आलो तर व्याधी पूर्ववत होईल. म्हणून मला आग्रह करु नकोस. मातृसेवा हाच धर्म मान बाळा. पुंडलिकाचा आदर्श डोळ्यापुढे ठेव. असे सांगून गंगाभारतीने त्या दोघांना सवडदला परत पाठिवले. गंगाभारती

दररोज समर्थांच्या जवळ बसून सुमधुर भजन गात असे. इतरांनाही आनंद मिळत असे. गंगाभारती पूर्ण बरा झाला. रोगाचा पत्ता मोडला. पुढे गंगाभारती मलकापुरीस गजाननाच्या आज्ञेने गेला.

असो, पुढे पौषमासी झ्यामसिंग शेगावी आलेला. म्हणाला, माझ्या गावी चला. मग म्हणाला, आज मी माझ्या भाच्याच्या अडगावी तुम्हांला न्यायला आलो आहे. समर्थ म्हणाले नाही मी नाही येत आता, नको करुस आग्रह. पुढेमागे येईन. मी तुझा भक्त आहे. आता चला मुंडगावात तो म्हणाला काही दिवस तरी राहा माझ्या घरी. झ्यामसिंगाबरोबर स्वामी महाराज गजानन मग मुंडगावी आले. भरपूर नारी-नर दर्शनासाठी आलेले. झ्यामसिंगाने भंडारा घातला. पैठणमध्ये एकनाथ. मुंडगावात गजानन. अनेक दिंड्या झाल्या. आचारी स्वयंपाक करत होते मुंडगावात, अर्धा स्वयंपाक झाल्यावर महाराज म्हणाले, झ्यामसिंगाला, झ्यामसिंगा आज आहे चतुदर्शी तर भोजनाच्या पंक्ती पौर्णिमेला होऊ देत.

झ्यामसिंग म्हणाला, महाराज स्वयंपाक तयार आहे, लोक जमले आहेत. लोक तुमचा प्रसाद घेण्यासाठी वाट बघत आहेत. महाराज म्हणाले, व्यवहारिक दृष्ट्या तुझे बोलणे योग्य आहे. पण त्या जगदीश्वराला मान्य हवे ना. पंक्ती भोजनाला बसल्या तशा आकाश भरून आले. विजांचा कडकडाट. मेघगर्जना झाली. झंझावाती वारा सुटला कडाकडा झाडे मोडू लागली. घटकेत सगळीकडे पाणी पाणी झाले. अन्न अवघे वाया गेले.

झ्यामसिंगाने महाराजांना विनंती केली. महाराज, उद्या तरी असे होऊ देऊ नका. हा ऋतू पावसाळा नाही ना. अहो आत्ता पाऊस पडला तर शेतीचे नुकसान होईल. आणि लोक म्हणतील की, झ्यामसिंगाने भंडारा घालून पुण्य केले ते भोवले आम्हांला. महाराज

म्हणाले अरे नको चिंता करुस, उद्या हा पर्जन्य तुला त्रास नाही देणार. आत्ताच मी ताडितो त्याला. असं म्हणून महाराज आकाशात बघू लागले. मेघ एका क्षणात निघून गेले. सगळीकडे छान ऊन पडले. अशी अगाध सत्ता आहे संतांची. दुसऱ्या दिवशी पौर्णिमेला भंडारा झाला. तोच नियम अजून आहे मुंडगावी. झ्यामसिंगाने आपली सर्व इस्टेट महाराजांच्या चरणी अर्पण केली.

त्याच मुंडगावात पुंडलिक म्हणून महाराजांचा एक निस्सीम भक्त होता. तरुण होता वयाने आणि उकिरड्या कुणब्याचा पुत्र असून ऐन तारुण्यात महाराजांचा भक्त झालेला. उकीर्डा हे नाव वऱ्हाडात मुद्दाम ठेवत बालकाचे. मुलं वाचत नसतील तर नवस म्हणून मुद्दाम हे नाव ठेवण्याचा प्रघात होता. हा पुंडलिक वद्य पक्षात नियमित वारी करण्यासाठी शेगावी येत असे. एकदा वऱ्हाडात ग्रंथिक रोग खूप वाढीस लागलेला. ह्याच्या तापात प्रथम थंडी वाजत असे अंग ज्वराने तप्त होत असे. डोळे लाल होत आणि संध्याकाळी शरीरावर कुठेतरी गाठ उठत असे. रुग्णाला शुद्ध पण राहत नसे. अशाच सन्निपाती ज्वराची साथ मुंडगावात आली. तेव्हाच पुंडलिकाची शेगावच्या वारीची वेळ झालेली. तो शेगावासी जाण्यास निघाला. पण अंगात कणकण जाणवत होती. ते त्याने कोणास सांगितले नाही. वडिलांबरोबर तो पुढे चालत होता. पाच कोस अंतर चालून झाल्यावर त्याच्या काखेत गाठ उमटली. शरीरात ज्वर भरला. त्याला एक पाऊलही पुढे टाकवेना. तो हैराण झाला. पुंडलिकाच्या वडिलांनी त्याला विचारले, का रे, असे का करतोस तू? पुंडलिक म्हणाला, बाबा, अहो मला ताप आलाय, शक्ती माझी सर्व क्षीण झाली आहे. आता मला चालवत पण नाहीये. बाबा, अहो काय हे माझं दुर्दैव! माझी वारी अपूर्ण राहिली. स्वामी गजानना ! ही एवढी माझी वारी होऊ दे पूर्ण. ह्यात खंड नका पडू देऊ. वारी पूर्ण झाल्यावर खुशाल येऊ दे ज्वर. माझापुण्य ठेवा हीच माझी वारी.

मुलाला असं पाहून वडीलही चिंतातूर झाले. रडायला लागले. एकुलता एक पुत्र दिलास मला गजानना ! देवा त्याला नेऊ नकोस. उकिर्डा पुत्रास म्हणाले की, गाडी, घोडा आणु का तूला बसायला. पुंडलिक म्हणाला, नाही बाबा, पायीच वारी झाली पाहिजे. मध्येच माझा मृत्यू झाला तरी माझे शव शेगावी न्या. अतिकष्ट सहन करून, मध्ये ऊठबस करत पुंडलिक शेगावी पोहोचला. समर्थंना बघून त्याला खूप आनंद झाला. समर्थांनी त्याच्या खाकेतील गाढ दाबली आणि पुंडलीकाला म्हणाले, तुझे गंडांतर टळले, तिळभर आता त्याची चिंता नको करुस. असं महाराजांनी म्हणताच त्याचा ताप उतरला. कंप अशक्तपणामुळे होता. महाराजांना पुंडलिकाच्या आईने नैवेद्य अर्पण केला. त्यातले दोन घास महाराजांनी सेवन केले तर पुंडलिकाचा कंप पूर्ण गेला. पुंडलिक पूर्ववत् झाला. अशक्तपणा थोडा होता. गुरुभक्तीचे फळ सत्य. उघडा डोळे अंधांनो, पुंडलिक मुंडगावी परत गेला. अशा प्रकारे गजाननाच्या कृपेने गजानन विजय ग्रंथ कथासाराचा तेरावा अध्याय पूर्ण झाला.



# श्रीगजानन विजय कथासार - अध्याय १४वा

श्रीगणेशाचे स्मरण करुन गजानन विजय ग्रंथ कथासाराच्या चौदाव्या अध्यायाल सुरुवात करुया,

खेर्डेगावचा रहिवासी मेहकर तालुक्याचा, बंडूतात्या नावाचा ब्राम्हण होता. सदाचारसंपन्न व उदार होता. संकटे अनेक येत, पण मानवाचा लोभ सुटत नव्हता. ह्या बंडूतात्याच्या घरी पाहुणे वरचेवर येत असत. तो सर्वांचे सर्व काही प्रेमाने करत असे. त्यामुळे त्याच्यावर कर्ज काढायची पाळी आली. घरदार गहाण पडले. अगणित असे ऋण झाले. विकावया काही न उरले. सर्व घर रिकामे झाले होते. लोकांना तोंड दाखवण्याची त्यांना लाज वाटायला लागली. सावकार सतत पैशासाठी तगादा लावत होते. बायकोपण मुलांसमोर अपमान करत होती. उसने आता कोणी देत नव्हते. त्याने शेवटी जीव द्यायची तयारी केली. जे सुखाचे स्थान होते ते दुःखाचे घर झाले होते. बंडूतात्या विचार करत होता. जीव कोठे जाऊन देऊ. अफू खाऊन जीव द्यायचा विचार केला तरी विकत घ्यायला तरी पैसे कुठे होते. मनात म्हणाला की, मी समजा विहिरीत जीव दिला आणि तितक्यात येऊन जर कोणी वर काढले तर जीव पण जाणार नाही, उलट फजिती होईल व सरकार आत्महत्यारा म्हणून शिक्षा देईल. ह्यापेक्षा हिमालयात जावे. असा विचार करुन तो घरातून बाहेर पडला. त्याने अखेरचा नमस्कार केला प्रपंचाला. एक लंगोटी घातली. राख लावली अंगाला. ही युक्ती त्याने केलेली ओळख आपली लपवायला. जननिंदेचे भय मनातून वाटत असते. त्या वेळी तो तिकीट काढायला स्टेशनात गेला. तेथे त्याला एक गृहस्थ भेटले. ते म्हणाले की, आधी हरिद्वारचे दर्शन घेऊ नकोस. संतदर्शन घे वऱ्हाड प्रांतात जाऊन श्रीगजाननाचे. गजानन महाराज हे महासंत आहेत. त्याचं दर्शन घेतलेले वाया जाणार नाही.

तेव्हा बंडूतात्या मनात विचार करत होत की, हे कोण होते? ह्यांना मी नाही ओळखले. असा विचार करुन तो शेगावी गेला गजानन महाराजांचे दर्शन घेण्यासाठी. दर्शन घ्यायला गेल्यावर महाराज त्याला म्हणाले की, हिमालयी जाऊन का देतोस प्राण? आत्महत्या कधीही करु नये. अरे आत्ता जरी प्रपंचाला कंटाळून जीव दिलास तरी प्रपंच भोगायला परत जन्म घ्यावा लागेल. माझं ऐक घरी जा. तुला जो स्टेशनवर भेटला तो माणूस कोण आहे तुला माहितेय का? अरे तुझ्या मळ्यात एक म्हसोबा आहे. त्या म्हसोबाच्या पूर्वेला एक बाभूळीचे झाड आहे. तिथे तू खोद. खाली तूला तिथे तीन फुटांवर द्रव्य मिळेल. ते कर्जदारांना देऊन ऋणमुक्त हो. नको सोडूस बायको मुलांना. वैराग्य वाहू नकोस तू. रात्रीच्या वेळी बंडूतात्या म्हसोबापाशी आला. बाभूळीखाली लागला जमीन खोदायला. तीन फुटांवर त्याला तांब्याची घागर मिळाली. त्यामध्ये चार शतक सोन्याच्या मोहरा मिळाल्या. त्या घेऊन तेथेच तो आनंदाने नाचू लागला. त्या द्रव्यातून त्याने गहाण पडलेला मळा सोडविला. प्रपंचाची घडी बसली. ही सर्व कृपा गजाननाची आहे. मृत्युघटका भरता अमृतकलश हाती यावा अशी स्थिती बंडूतात्याची झालेली. महाराजांची कृपा अगाध आहे. बंडूतात्या दानधर्म करत असे. तो गजाननाच्या पदी अनन्य भावाने लीन झाला महाराज त्याला म्हणाले की, आता खर्च कर सांभाळून. उगाच उधळू नकोस. समर्थांना वंदन करुन बंडूतात्या आपल्या गावी परत गेला.

एके दिवशी सोमवती अमावास्या आली, ह्या दिवशी नर्मदास्नान करावे असे उल्लेख पुराणात आहेत. म्हणून शेगावची मंडळी मार्तंड पाटील, बंकटलाल, मारुती, चंद्रभान, बजरंगलाल ह्या सर्वांनी ओंकारेश्वरी जाण्याचा बेत आखला. बंकटलाल म्हणाला की, चला, सोबत आपल्या महाराजांना पण घेऊ. हे चौघे मठामध्ये आले. महाराज आमुच्यासोबत ओंकारेश्वराला चला ना! ते म्हणाले नको मी

नाही येत येथे बसून मी नर्मदेचे स्मरण करतो. तुम्ही जाऊन या ओंकारेश्वराला. तेथे पूर्वी एक महाबली असा राजा होऊन गेला. श्रीशंकराचार्यांनी परमहंसाची दीक्षा तिथेच घेतली. आग्रह नका करु तुम्ही जा. असे महाराजांनी सांगताच ह्या चौघांनी महाराजांचे पाय धरले व त्यांना आग्रह करु लागले. महाराज म्हणाले, ठीक ठीक, तुम्ही दिसता दांभिक. नर्मदेचे आहे उदक आपल्या विहिरीत. तिला टाकून गेलो तर तिला वाईट वाटेल म्हणून सांगतो, मला आग्रह नका करु. हे माझे वचन माना ह्यातच तुमचे कल्याण, मी तिथे आलो तर होईल विपरीत मग मात्र दोष देऊ नका.

सगळे जण ओंकारेश्वरी आले. नर्मदेच्या घाटावर स्त्री-पुरुषांची अपार गर्दी होती. अगदी मुंगीलाही चालायला जागा नव्हती. कोणी स्नानास उतरले. कोणी संकल्प ऐकत होते. कुणी बेल फुले घेऊन मंदिरात जात होते. थव्यामागून थवे भजन करणाऱ्यांचे येत होते.

नर्मदेच्या काठावर समर्थ पद्मासन घालून बसले होते. चौघे दर्शन घेऊन आले. महाराजांना म्हणाले, ''रस्त्यावर आज आता खूप गर्दी असेल. बैलगाडीचे बैल बुजार आहेत. खेडीघाटी स्टेशनपर्यंतचा करार गाडीवाल्याने बैलांचे हे गुण न सांगताच केला आहे. म्हणून परत गाडीत बसून जाणे योग्य वाटत नाही. म्हणून या नावेत बसून आपण स्टेशनला जाऊया''. महाराज म्हणाले, ''आता मला काही विचारु नका. तुम्ही बसाल तिथे मी बसेन'', समर्थ असे म्हणाले व त्यांच्यासह नावेमध्ये जाऊन बसले.

नदीतून नाव पुढे सरकू लागली. मध्यंतरी पोहोचताच नाव खडकावर आदळली. तिच्या बुडाची फळी फुटून गेली. छिद्र पडले एक मोठे. त्यातून पाणी येऊ लागले. नावाड्याने लगेच नदीत उडी टाकली. सगळे जण घाबरुन गेले. पण महाराज मात्र गण गण गणांत बोते असे

अखंड भजन करत होते. चौघे समर्थांना म्हणाले, ''महाराज, हे शेगावीच्या दयाळा, आम्हाला क्षमा करा. आम्ही तुमचे अपराधी आहोत. आम्ही तुमचे ऐकले नाही. त्याचेच हे फळ मिळाले. गुरुराया आपली वाणी वेदतूल्य आहे. आम्हांला वाचवा या संकटामधुनी'' असे ते म्हणत असतानाच त्यांची नाव अर्ध्या पाण्यात बुडाली. काठावरचे लोक म्हणत होते. अरेरे पाची माणसं बुडाली हो, आता यांचा भरवसा नाही. अथांग पाणी आहे ह्या नर्मदेला.

गजानन स्वामी चौघांना म्हणाले, ''आता घाबरू नका, ही नर्मदा तुमच्या जिवाला धक्का लावणार नाही''. त्यांनी नर्मदेचे स्तवन केले. हे चौघे नावेत हात जोडून बसले होते. नर्मदे मंगले देवी, रेवे अशुभनाशिनी मंतु म्हणजे अपराध ह्यांचा क्षमा करा. मनापासून असे स्तवन चालू होते. तो आतील पाणी निघून गेले. नर्मदेने तिचे कर त्या छिद्रास लावले. तशी नाव पहिल्यासारखी वरती आली. नर्मदेने कोळिणीचा वेष धरला. मस्तकावरी कुरळे केस, नौका काठावरी आली. सर्वजण आश्चर्यचकित झालेले. ह्या बाई होत्या म्हणून प्राण वाचले आमचे. बाई, आपण कोठल्या कोण ? तुमचे वस्त्र ओले झाले असेल तर नवीन देतो. ती म्हणाली ''मी ओंकार कोळ्याची कन्या. माझे नाव नर्मदा. ओली साडी नेसण्याचा परिपाठ आहे माझा. मी ओलीच राहते निरंतर. माझे रुप आहे नीर''. महाराजांना तिने नमस्कार केला आणि क्षणामध्ये ती नाहीशी झाली. स्वामी गजाननाचा अधिकार समजला. चौघे खूप आनंदले. बंकटाने खोदून खोदून महाराजांना विचारले की, महाराज, सांगा ना कोण होती ही कन्या ? कोळी जो ओंकारेश्वर त्याची कन्या नर्मदा. असं ऐकता चौघांनी महाराजांना वंदन केले. सर्वजण आनंदाने शेगावी परत आले.

सदाशिव रंगनाथ वानवळे असे भले गृहस्थ एकदा शेगावात आले महाराजांच्या दर्शनासाठी. तात्या हे त्यांचे टोपण नाव.

माधवनाथांचे हे शिष्य. योगाचे अभ्यासक होते. त्यांचे शिष्यगण माळयात आहेत. सदाशिवाला पाहून गजाननाला माधवाची आठवण झाली. महाराज तेव्हा भोजनाला बसले होते मठात. ते म्हणाले माधवनाथाच्या शिष्याला माझ्यापुढे आणून बसवा. इतक्यातच त्यांचे गुरु माधवनाथ जेवायला येऊन गेले. थोडा वेळ आधी आले असते तरी त्यांची त्यांच्या गुरुंशी भेट झाली असती. त्यांचे गुरु विडा न घेता गेले. त्याची आता पूर्तता करुया. वानवळ्यांना महाराजांनी आलिंगन दिले. रितीप्रमाणे त्यांचा सत्कार केला. माधवनाथांना द्यायला दोन विड्याची पाने दिली. गेल्यावरी सदाशिवाने महाराजांना सर्व हकिकत सांगितली. महाराज, त्या दिवशी तुम्ही शेगावी गेला होतात का ? अरे स्मरण म्हणजे भेट असे माधवनाथांनी सदाशिवाला समजावले. खोल आहे अरे हे ज्ञान. इतक्यात नाही कळणार तुम्हांला.

खरा योगी असल्याशिवाय असे कौतुक होणार नाही. दांभिकासाठी हे अशक्य आहे. योग आहे बलवत्तर.

अशाप्रकारे दासगणू विरचित गजानन विजय ग्रंथ कथासासाराचा चौदावा अध्याय समाप्त होतो.



## श्रीगजानन विजय कथासार - अध्याय १५वा

श्रीगणेशाला वंदन करुन अध्यायाला सुरुवात करुया. हे नारायणा, तू बळिराजाकडून दान घेऊन त्याला कृतार्थ केलेस रे, मृत्युलोकीचे त्याचे राज्य घेऊन त्याला पाताळलोकाचे राज्य दिलेस. आवळा घेऊन नारळ दिलास. त्याच्या भक्तीस्तव तुम्ही द्वारपाल झालात. तुझ्या वरामुळे नारायणा, बलीच होणार आहे देवांचा राजा. देवांनाही तू आनंदी ठेवलेस आणि राक्षसांनासुद्धा. तुझं ईशत्व तू सांभाळलस. तुला आमचा वारंवार साष्टांग नमस्कार, तुझे कृपाशीर्वाद आमच्यावर असेच ठेव.

ह्या महाराष्ट्राचा कोहिनूर म्हणजे बाळ गंगाधर टिळक, म्हणजेच आपले लोकमान्य. दूरदृष्टीचा महासागर आहेत ते. स्वातंत्र्य मिळवण्यासाठी त्यांनी अथक परिश्रम घेतले. त्यांच्या धाडसाचे मी काय वर्णन करु? भीष्मासमान करारी. वाक्चातुर्य त्यांचे बृहस्पतीसमान. त्यांच्या कर्तृत्वाने इंग्रजांचे धाबे दणालले. कृतीतून त्यांनी लोकमान्य ही पदवी मिळवली.

अकोल्याला शिवजयंतीच्या उत्सवासाठी, लोकआग्रहासव लोकमान्यांना आमंत्रण होते. मोठमोठ्या विद्वानांची गडबड उडली होती. लोकमान्य व्याख्यानासाठी तयार होते. दामले, कोल्हटकर, खापर्डे अशी मंडळी जमली होती. उत्सवाचे अध्यक्ष लोकमान्यांना नेमले होते. खरंतर शिवजयंती आधीच वऱ्हाड प्रांतात साजरी व्हायला हवी होती. शिवाजीची माता जिजा हिचा जन्म हा वऱ्हाडातील सिंदखेडीचा आहे. ह्या मातेच्या कर्तृत्वामुळे वऱ्हाड व महाराष्ट्र एक झाले. एक महिना आधीपासूनच शिवजयंतीची जोरदार तयारी सुरु होती. अध्यक्षांबरोबर उपाधक्षांची निवड झालेली. स्वयंसेवक सर्व कामांची जबाबदारी योग्य तऱ्हेने पार पाडत होते. अशावेळी गजानन

महाराजांना पण आपण ह्या सभेसाठी बोलावले तर दुग्धशर्करा योग होईल अशी विचारधारा स्वयंसेवकांच्या मनात आली. कित्येकांना हे आवडले तर कित्येकांना आवडले नाही. ते त्यांनी बोलून दाखवले. त्या गण गण जपणाऱ्या वेड्यापिश्याला का बोलावताय? काही माणसे म्हणाली, गजानन महाराजांची पावले सभेला लागली पाहिजेत. खऱ्याखोट्याची परीक्षा साधूच करतात. त्यांना आमंत्रण द्यायला घाबरु नका. दादा खापर्डे आणि मंडळी महाराजांना आमंत्रण देण्यासाठी शेगावात आलेली. महाराज लगेचच त्यांना म्हणाले, आम्ही शिवाजीच्या उत्सवासाठी सभेला येऊ. वेड्यापरी तिथे करणार नाही. जागीच बसून मौन धरू. राष्ट्रउद्धार करण्यासाठी लोकमान्यच हवेत. त्यांच्यासारखे राष्ट्रपुरुष परत होणार नाहीत. सभेचा दिवस आठ दिवसांवर आला. वऱ्हाड सारे आनंदात होते. सर्वांना असे वाटत होते की, आम्ही टिळकांना कधी पाहतोय. लांब लांबहून लोकं खास लोकमान्यांना बघण्यासाठी आली होती. मंडप गच्च भरलेला होता. सभेमध्ये उच्चस्थानावर महाराज लोडाला टेकून गादीवर बसले होते. सिंहासनाच्या अग्रभागी टिळकांसाठी जागा होती. त्यांच्याबरोबर अण्णासाहेब पटवर्धन, श्रीकृष्णाचा नंदन गणेश ज्याचे नाव जे खापर्डे कुलाचे कुलभूषण होते, ते टिळकांच्या बाजूला बसले होते.

अनेक विद्वान व्याख्याते सभेला उपस्थित होते. सभेला आरंभ झाला. प्रथम सभेचा हेतू निवेदन केल्यावर भाषणासाठी व्याख्यानसिंह लोकमान्य उठले, त्यांनी सुरुवात अशी केली की, दिवस आजचा धन्य आहे. स्वातंत्र्यासाठी ज्याने आपले प्राण खर्चिले आहेत पूर्वकाळी त्या धुरंधर योद्धा वीरगाजी शिवाजीची जन्मजयंती आहे आज. रामदास स्वामी त्यांचे गुरु आणि म्हणूनच भारतखंडात शिवाजीचा बोलबाला झाला. आजची सभा यशस्वी होऊ दे. अशाच सभेची खरी गरज आहे आपल्या राष्ट्राला. स्वातंत्र्याचा सूर्य मावळलेला आहे. सगळीकडे दास्यत्वाचा काळोख आहे. ज्याला स्वातंत्र्य नाही जगताना, तो समाज

प्रेतवत असतो. म्हणून हे करणे गरजेचे आहे. ज्याने राष्ट्रप्रेम वाढेल. हा भूपती देईल का असे शिक्षण अर्भकाला? असं लोकमान्य म्हणाले. मग गजानन महाराज आपल्या स्थानावर आसनी उठून बसले. त्रिवार गर्जना करत म्हणाले, नाही नाही, आवेशाच्या भरात बोलले गंगाधरसुत. जे बोलणे किंचित टोचून होते राजाला. त्याच्या भाषणाचा रोख समर्थांनी जाणिला आणि हसून म्हणाले, श्रोते हो अशानेच दंडाप्रत काढण्या पडतात. असं म्हणून गजानन गण गण गणांत भजन करु लागले. सभा निर्विघ्न पार पडली. टिळकांची वाहवा झाली. पण समर्थांचे भाकीत खरे झाले. १२४ च्या कायद्यानुसार टिळकांना बेड्या पडल्या. शिक्षेचा प्रसंग आला. राजसत्तेच्यापुढे कोणाचे घोडे चालले नाहीत. मोठे-मोठे वकील टिळकांसाठी झटत होते. पारमार्थिक उपाययोजना पण केली. दादासाहेब खापर्डे हे गृहस्थ बडे होते. ते उमरावतीहून मुंबईकडे खटल्यासाठी जाऊ लागले. अकोला स्टेशनवर ते कोल्हटकरांना म्हणाले, तुम्ही शेगावी जा आणि महाराजांना सांगा, तुम्ही सोडवा बाळ टिळकासी. प्रसंग मोठा दुर्धर आहे. पण मी मुंबईला जातो आहे. कोल्हटकर लगेचच शेगावी निघाले. येऊन गजानन महाराजांना भेटले. महाराज मठात आसनावर निजून होते.

तीन दिवस आसनी निजून राहिले. कोल्हटकर पण चिकाटीने मठात बसून राहिले. चौथ्या दिवशी समर्थ उठले. कोल्हटकरांना म्हणाले, तुम्ही अलोट प्रयत्न केले तरी फळ नाही येणार त्याला. रामदासांचा वशिला शिवाजीला होता. तरी पण बादशाही कैदेत त्याला राहायला लागले. ही मी जी भाकर देतो ती लोकमान्यांना लवकर खायला घाल. या भाकरीच्या बळावर तो मोठी कामगिरी करेल. असे उत्तर ऐकता साशंक झाले कोल्हटकर. भाकर नेऊन ती त्यांनी लोकमान्यांना खायला दिली. सुरुवातीपासूनचा सर्व संदेशमुद्दा महाराजांचा सांगितला.

लोकमान्य हसले व म्हणाले, महाराजांचे अगाध ज्ञान सत्य आहे खरे. भूत, भविष्य, वर्तमान जाणतात साधुजन. आपण सामान्य मनुष्य, पाहूया पुढे काय होते. प्रसाद म्हणून लोकमान्यांनी दात नसताना ती भाकरी कुसकरुन खाल्ली. टिळकांना शिक्षा झाली. त्यांना ब्रम्हदेशी नेले मंडाले येथे आणि तिथेच लोकमान्यांनी 'गीतारहस्य' हा ग्रंथ लिहिला. समर्थांनी वर्णिलेली हीच ती मोठी कामगिरी. या गीतारहस्यावर अपार टीका झाल्या. पण ह्या कामाची सर दुसऱ्या कोणत्याही कृत्याला येणार नाही. हीच बाळ गंगाधरांची कामगिरी अजरामर होईल आणि त्यांची कीर्ती दूरवर पसरवेल. गीताशास्त्र हे मोक्षदायी आहे.

करवीर कोल्हापूरच्या द्विज चित्तपावन जातीचा ज्यांचे नाव श्रीधरगोविंद काळे. तो गरिबीच्या स्थितीत इंग्रजी शाळेत आंग्लविद्या शिक्षण घेण्यासाठी गेला. मॅट्रिक परीक्षा पास झाल्यावर कॉलेजात गेल्यावर इण्टर परिक्षा मात्र नापास झाला. म्हणून वेगवेगळी वर्तमानपत्रे तो वाचत होता. केसरी वृत्तपत्रात त्याने ओयामा टोगो चरित्र वाचले व ते वाचून विलायतेला जाण्याची इच्छा त्याच्या मनात निर्माण झाली. टोगो यामा ह्या दोघांप्रमाणे ज्ञान संपादन करुन आपण आपल्या जन्मभूमीचा उद्धार करुया. पण तेवढे आवश्यक द्रव्य त्याच्याकडे नव्हते. घरात पण खूप गरिबी होती. भंडाऱ्याला तो आपल्या मित्राला भेटायला गेला, जो शिक्षक होता. त्याला श्रीधराने त्याचा विचार सांगितला. त्याला पण तो विचार पसंत पडला, पण पैशाची सोय तरीही नव्हती. दोघेही कोल्हापूरला जायला निघाले. गजानन महाराजांच्या कीर्तीला स्मरुन शेगावात उतरले. महाराज कसे दिसतात , अशी त्यांना उत्सुकता होती. पोस्टमास्टरच्या दारी सामान ठेवले आणि मठात महाराजांच्या दर्शनासाठी गेले. महाराजांसमोर हात जोडून बसले. तेव्हा महाराज म्हणाले, ''अरे वेड्या, तू देशाचा

विचार करु नकोस. सर्व काही इथेच आहे. अध्यात्मविद्येचे सेवन कर म्हणजे तू कृतार्थ होशील. श्रीधरा, मनातून हिंदुस्थान सोडून जाण्याचा विचार सोडून दे. अगणित पुण्य कर तेव्हाच येथे जनन होईल. ह्या भौतिक शास्त्राहून योगशास्त्र समर्थ आहे. योगशास्त्र ज्याला येते तो या भौतिक शास्त्राला मानत नाही. अध्यात्मविचार श्रेष्ठ आहे. संतावाचून विचाराचे परिवर्तन कोणी सोडवू नाही शकत. तुझी बायको पण कोल्हापुरात तुझी वाट पाहते आहे. जा आता मित्रासह कोल्हापुरास''.

महाराज म्हणाले, तेच सत्य झाले. श्रीधर याला लौकिक प्राप्त झाला. बी.ए., एम.ए. झाले. प्रिन्सीपॉल झाला. शिवपुरी कॉलेजात.

संत हे साक्षात ईश्वर चालते बोलते भूमीवर. त्यांच्या कृपेचा ज्याला आधार मिळे तो मोठा होई निःसंशय. श्रीधर काळे याला महाराजांच्या दर्शनाचा योग आला आणि वृत्तीत फरक पडला.

अशाप्रकारे श्रीदासगणू विरचित गजानन विजय ग्रंथ कथासाराचा पंधरावा अध्याय इथे पूर्ण होतो.



# श्रीगजानन विजय कथासार - अध्याय १६वा

श्रीगणेशाचं स्मरण करुन अध्यायाची सुरवात करते. जमदग्नी ऋषींचा पुत्र म्हणजे भगवान परशुराम. परशुरामाने ब्राम्हणांचे संरक्षण केल्याचे इतिहासात वर्णन आहे. भगवान शंकराचा अवतारच परशुराम आहेत.

गजानन महाराजांची माया अघटित आहे. तिला कोण जाणणार ? मुंडगावामध्ये गजानन महाराजांचा पुंडलिक नावाचा एक भक्त राहत असे. ह्याचे महाराजांवर विशेष प्रेम होते. दरवर्षी तो शेगावची वारी मुद्दाम करत असे. त्यांचे चिंतन तो अगदी हृदयापासून करत असे. त्या गावात एक भागाबाई म्हणून ठाकरीण होती. तिची निष्ठा एका ठिकाणी कधीच राहत नसे. दांभिक होती ती फार. कायम ती भोळ्याभाबड्या लोकांना फसवत असे. हाच तिचा धंदा होता. ती पुंडलिकाला सांगे, तुझा जन्म असाच वाया गेलाय. कारण तू गुरु नाही केलास. गजानन महाराजांच्या शेगावच्या वाऱ्या करितोस तू, पण त्यांनी गुरुमंत्र कुठे दिलाय तुला ? अरे विधिवाचून गुरु होत नाही असा. शेगावचा गजानन आहे वेडापिसा साधू. तुझा पुंडलिका, ताप बरा झाला म्हणून तू त्याला गुरु मानतोस. या काकतालीय न्यायाला पुंडलिका तू बळी नकोस पडूस. गण गण गणांत बोते हे भजन करतो, भ्रष्ट आहेत ते, म्हणून तुला सांगते चल माझ्याबरोबर अंजनगावाला. केकाजीचा शिष्य तिथे आहे. त्याला आपण दोघे गुरु करुया. चल उद्याच सकाळी जाऊयात अंजन गावाला. अरे गुरु हा महाज्ञानी असावा. चातुर्यशास्त्र चिंतामणी गुरु असावा परमगुणी पण ह्यामधील एकही लक्षण गजाननामध्ये नाही.

पुंडलिक मनाने भाविक होता. म्हणून त्याच्या मनात द्विधा स्थिती निर्माण झाली. भागाबाईचे भाषण ऐकून तो गोंधळला. तो भागाबाईला म्हणाला, ''मी येईन तुझ्याबरोबर अंजनगावाला कीर्तनासाठी. पुढचा विचार पुढे करु'' पुंडलिक रात्री स्वस्थ निजला. रात्री तीन प्रहराला पुंडलिकाच्या समोर एक दिगंबर पुरुष उभा राहिला. तो पुरुष पुंडलिकाला म्हणाला, ''अरे अंजनगावाला का जातोयस गुरु करण्यासाठी आणि तेसुद्धा त्या भागाबाईच्या सल्ल्याने. तिथे जाऊन तुझी भ्रांत फिटेल असं वाटतं का ? कानात गुरुने काही सांगितले म्हणजे तोच गुरुमंत्र असे होत नाही. लोक एकमेकांच्या कानात किती कानगोष्टी करतात. म्हणून ते एकमेकांचे गुरु होत नाहीत. तू ह्या सगळ्यात पडू नकोस. पुंडलिका, इकडे कान कर, मंत्र देतो तुला असं म्हणून 'गण गण'' असं कानात सांगून महाराज स्तब्ध झाले. ''अजून काही आस आहे का तुझी ? ती मी पुरवीन, असे ऐकता पुंडलिक खूश झाला''.

स्वप्नामध्ये पुंडलिक त्या व्यक्तीला नीट निरखून पाहत होता, तो त्याला दिसले गजानन. पुंडलिक म्हणाला, गुरुराया तुम्ही मला तुमच्या पादुका द्या. त्यांची मी नित्य पुजा करेन. दुसरी काही इच्छा नाही. गजानन म्हणाले उद्या दुपारी दोन वाजेपर्यंत तुला माझ्या पादुका मिळतील. रोज त्यांची पूजा कर. पादुका घेण्यासाठी पुंडलिकाने हात पुढे केले व तो स्वप्नातून जागा झाला. सभोवार बघू लागला. काहीच उलगडा त्याला होत नव्हता. स्वप्नाचा अर्थ त्याला समजत नव्हता. नवीन पादुका तरी कशा घेऊ महाराजांनी त्या मला दिलेल्या ना. असे वेगवेगळे तर्क पुंडलिक करत होता. तेवढ्यात ती भागाबाई घरी आली, म्हणाली, येतोयस ना अंजनगावाला, तर पुंडलिक म्हणाला, मी काही

येत नाही. तुझी मर्जी असेल तर तूच जा. मी गजानन महाराजांनाच आता माझे गुरु मानले आहे. आता मी त्यांना सोडणार नाही. हा माझा निश्चय आहे. हे ऐकता भागाबाई अंजनगावाला गेली. इकडे मुंडगावात काय झालं ऐका, झ्यामसिंग रजपूत जो होता तो नेमका त्या दिवशी शेगावी गजानन महाराजांचे दर्शन घेण्यासाठी गेला होता. जेव्हा तो शेगावहून गावी परत येण्यासाठी निघाला, तसे महाराज बाळाभाऊला म्हणाले, की ह्या घे पादुका, पुंडलिकाला दे. तसे बाळाभाऊने झ्यामसिंगाला समर्थांची आज्ञा सांगितली. हातात पादुका घेऊन झ्यामसिंग म्हणाला, पुंडलिक भोकरे का, त्यास का? त्याला देतो मी. असे म्हणून झ्यामसिंग मुंडगावी येण्यासाठी निघाला. तेव्हा पुंडलिक वेशीवर त्याला बरोबर दिसला तो म्हणाला, अहो, महाराजांनी माझ्यासाठी काही दिलं आहे का? झ्यामसिंगाला खूप आश्चर्य वाटले. तो खोदून खोदून विचारत होता. तेव्हा पुंडलिकाने झ्यामसिंगाला स्वप्नातील सगळी कथा सांगितली. झ्यामसिंग ते ऐकताच खूप आनंदला. त्याने पिशवीतून लगेच पादुका काढल्या. पुंडलिकाच्या हाती दिल्या. अजूनही पुंडलिकाच्या गावी म्हणजे मुंडगावात त्या पादुकांचे पूजन दोन प्रहरी केले जाते. पुंडलिक दररोज मनोभावे त्या पादुकांचे पूजन करत असे. श्रोते हे खरे संत जे सांभाळतात आपले भक्तः समर्थ आपल्या भक्तांचे मनोरथ कसे पूर्ण करतात हे आता पुढील कथेतून तुम्हाला समजेल. एक वाजसनीय ब्राम्हण कवर राजाराम म्हणून अकोल्यामध्ये सराफिचा धंदा करत होता. मध्यम प्रतीचा तो सावकार होता. या राजारामाची महाराजांप्रती भक्ती होती. म्हणून त्याची संतती महाराजांना मानू लागली. त्या कवरास दोन पुत्र होते, गोपाळ आणि त्र्यंबक. अगदी लवकुशांसारखे.

कनिष्ठ पुत्र त्र्यंबक याला लहानपणापासून देवध्यान होते. काही संकट पडल्यावर तो समर्थांचा धावा करीत असे. लहानपणापासून गजाननच त्याचे दैवत होते. तो हैद्राबादमध्ये डॉक्टरी शिकत होता. जेव्हा तो सुट्टीमध्ये घरी आला, तेव्हा त्याला महाराजांना शेगावी जेवण नेऊन जेवू घालावे अशी इच्छा निर्माण झाली. पण हे सर्व कसे व्हायचे, असा विचार तो मनामध्ये करत होता. आता मी काय करु? आई नाही आणि भावाची बायको जी आहे ती जरा तापट आहे. तिला कसे सांगू मी? तेवढ्यात त्याची वहिनी तिथे आली. म्हणाली अहो, भावजी कशाची चिंता तुम्ही करताय सांगा मला! तुमचा चेहरा एवढा ग्लान का झालाय? तेव्हा त्र्यंबक वहिनीला म्हणाला, मला शेगावी महाराजांसाठी जेवण न्यायचे आहे. नानी त्यावर म्हणाली, अरे एकवार तू सांगून तरी पाहायंचस ना मला, तू माझा धाकटा दीर आहेस अगदी माझ्या भावाप्रमाणे. हे ऐकून भाऊ हसला.

''वहिनी, मला असे वाटते की, महाराजांच्या आवडीचे पदार्थ करुन न्यावे. तुलाही ह्याचे नक्की पुण्य लाभेल''. वहिनी हसून म्हणाली, ''सांगा, काय-काय हवे आहे तुम्हांला''? वहिनी पण लगेच स्वयंपाकाला लागली. भाजी, चूनभाकर, ओंजळभर हिरव्या मिरच्या आणून ठेविल्या. भाकरी, कांदे तीन, हरभऱ्याचे चून, लोणी, असे तिने त्या भाकरीला लावून ठेवले. वहिनी दिराला म्हणाली, की तू लवकर जा आता शेगावा. वेळ थोडाच राहिला आहे गाडीला. गाडी चुकली तर सर्व तयारी वाया जाईल. भोजनाच्या वेळी गेलात तर खरा उपयोग. असं वहिनीने सांगितल्यावर, तो लगेच निघाला. तो स्टेशनला पोहोचेपर्यंत बाराची गाडी निघून गेली. त्यामुळे तो दुःखी झालेला. त्याचा हिरमोड झाला. त्याच्या डोळ्यांत पाणी आले होते. अक्षम्य अशी काय चूक झाली माझ्याकडून.

आज माझी ही शिदोरी अशीच राहणार का? गुरुराया, अशी लेकराची उपेक्षा करु नका. ही शिदोरी सेवण्यासाठी तुम्ही या सत्वर. तुम्ही तर अंतर्यामी आहात. तसाच उपाशी तो स्टेशनवर बसून राहिलेला. चौथ्या प्रहरी तो शेगावी आला आणि दर्शना गेला. बघतो तर काय, गजानन महाराजांनी नैवेद्य सेवन केला नव्हता. मोठमोठी ताटे पक्वांन्नानी भरलेली महाराजांसमोर ठेवली होती, पण त्यांनी त्याला हात पण नाही लावला. जेवणाची वेळ टळून गेली. महाराज म्हणाले, की आज माझे भोजन चौथ्या प्रहरी आहे. म्हणून जेवणाचा आग्रह आधी करु नका. महाराज कवराला म्हणाले, की भोजनाचे निमंत्रण दिलेस आणि ही का वेळ जेवण्याची? तू जी हाक हृदयापासून मारलीस त्यात मी गुंतलो. मी उपाशी राहिलोय अजून. आण तुझी शिदोरी. असं महाराज बोलल्यावर कवर एकदम आनंदित झाला. गुरुराया, काय करु? गाडी चुकली हो बाराची. कवराला बाळाभाऊ म्हणाले, आता दुःख नको करुस. दाखव काय आणले आहेस समर्थांसाठी जेवायला? लगेचच त्याने शिदोरी महाराजांसमोर ठेवली. त्यातील दोन भाकऱ्या समर्थांनी सेवन केल्या आणि एका भाकरीचा प्रसाद सर्व भक्तांमध्ये वाटला. तो प्रकार बघून सर्व भक्त आश्चर्यचकित झाले. समर्थ कवराला म्हणाले, जा आता अकोल्याला. पास होशील तू पुढील वर्षी वैद्यकीय परीक्षा. गुरुराया, अशीच तुमची कृपादृष्टी आमच्यावर कायम ठेवा.

तुकाराम शेगेकर हा शेगावीचा शेतकरी होता, पण भाविक होता. घरची गरीबी होती. शेतात काम करुन वेळ झाल्यावर मठात येऊन महाराजांची सेवा करत असे. एके दिवशी तो शेतात काम करत होता तेव्हा नेमका एक शिकारी तिथे आला. नुकताच सूर्य उगवत होता. नेम धरून तो ससा मारायचा प्रयत्न करता होता झाडाआडून

त्याने नेम धरला होता. त्यायोगे ससा मेला. पण एक छर्रा तुकारामाला लागला नेमका कानामागे. छर्रा मस्तकी शिरला. डॉक्टरांचे विविध उपचार केले तरी फरक नाही पडला. खूप यातना तुकारामाला होत होत्या. मस्तक त्याचे अहोरात्र दुखत असे. नवस करुनही गुण येत नव्हता.

अशा अवस्थेत पण तुकाराम रोज मठात येत असे. तो समर्थांचा एक भक्त त्याला म्हणाला, वैद्य सोडा आता. महाराजांची कृपा झाली तर हा तुझा त्रास नक्की शमेल. रोज हा आसपासचा मठाचा परिसर आहे तो झाडत जा. अशाने तुझी सेवाही होईल. मनात शुद्ध भाव ठेवून तुकारामाने १४ वर्षे सेवा केली व पूर्ण मठ स्वच्छ ठेविला. एक दिवस कानाच्या भोकातून छर्रा गळून पडला. मस्तक दुखायचे थांबले. महाराजांच्या ठायी पूर्ण निष्ठा ठेवली की संतकृपा होतेच.

अशा प्रकारे श्रीगजानन विजय कथासाराचा सोळावा अध्याय इथे पूर्ण होतो.



## श्रीगजानन विजय कथासार - अध्याय १७वा

श्रीगणेशाला वंदन करुन, आपण सतरावा अध्याय कथासाराचा सुरुवात करुया. हिरण्यकश्यपूचा मुलगा म्हणजे प्रल्हाद, त्याच्या संरक्षणासाठी तू नरसिंहाचा अवतार घेतलास, स्तंभामधून जन्म घेऊन नखांनी पोट फाडून हिरण्यकश्यपूचा वध केलास, असे भयंकर रूप तू धारण केलेले. ब्रम्हांड जाळू तू पाहात होतास नारायणा, त्या भयंकर रुपापुढे लक्ष्मीदेवीपण समोर येत नव्हत्या, पण अशा परिस्थितीत तुझा भक्त प्रल्हाद याने तुझ्या पायांवर साष्टांग नमन केले आणि तुझा क्रोध शांत झाला.

गजाननाचे परमभक्त अकोल्यात होते. त्यांच्या घरी समर्थ कायम येत असत. जिजाबाई पंडित, बच्चुलाल, गोंदुलालाचा नंदन, शेट कुटुंब अशी असंख्य घरं महाराजांनी बांधलेली होती. एके दिवशी स्वामी आले अकोल्याला, खटाऊच्या गिरणीत त्यांनी मुक्काम ठेवला. एक भक्त मलकापुरी, विष्णुसा त्याचे नाव होते. त्याला मनापासून असे वाटले की, आपण, महाराजांना मलकापुरात घेऊन यावे. त्याने आमंत्रणाचा वशिला भास्कराकडे लावला, हाच भास्कर अडगावी समाधिस्थ झालेला.

भास्कर समर्थांना म्हणाला की, ''महाराज, विष्णुसाच्या घरी मलकापुरी याल का? तो खास तुम्हांला बोलावयाला आला आहे. मलकापुरीचे लोक वाट पाहत आहेत''. तर महाराज म्हणाले, ''भास्करा, सध्या मी नाही येत मलकापुरी तू उगीच आग्रह करू नकोस. फार आग्रह केलास तर तुझीच फजिती होईल. याचा तू आधीच विचार कर, दोरीला ताण दिला तर ती दोरी मध्येच तुटते जाण. मी इथून हलणार नाही, तू या फंदात पडू नकोस''. तर भास्कर

म्हणाला, ''काही असो, तुम्ही चला विष्णुसाच्या घरी हीच माझी विनंती गुरुराया. मी तुमचा लाडका आहे ना मग माझ्या वचनाला धक्का देऊ नका. माझी प्रतिज्ञा पूर्ण करा. चला आता स्टेशनवर गाडीत बसायला''. असा आग्रह करून महाराजांना घेऊन भास्कर स्टेशनवर आला. भास्कराने स्टेशनमास्तरांना विनंती केली व बारा जणांचा डबा संतासाठी खाली करवून घेतला. महाराज तसेच बसले. काही बोलले नाहीत व जागेवरुन उठले नाहीत. गाडी सुटण्याची घंटा झाली. तसे भास्कराचा डोळा चुकवून योगिराज बायकांच्या डब्यामध्ये जाऊन बसले.

महाराज आधीच दिगंबर. सर्व स्त्रिया घाबरल्या. पोलिसाला वर्दी दिली. पोलीस तिथे आला, महाराजांना म्हणाला, ''अरे वेड्या, नंगा, पिरा अक्कल नाही का तूला? बायकांच्या डब्यात कसे येऊन बैसलास?'' महाराज अधिकाऱ्याला मुळीच घाबरले नाहीत. पोलीस अधिकारी स्टेशन मास्तरकडे गेला, म्हणाला बायकांच्या डब्यापाशी चला. दोघे डब्याजवळ आले. मास्तराने बघितले गजानन महाराजांना, तो पोलीस अधिकाऱ्याला म्हणाला, ''हे शेगावचे थोर संत आहेत. त्यांना याच गाडीने जाऊ द्या ह्या डब्यात बसून'' अधिकारी म्हणाला, आता मी पुढे तार दिली आहे. आता माझ्या हातात काही नाही. आता माझा वरिष्ठच निर्णय देऊ शकेल. स्टेशन मास्तरांनी टोपी काढली व महाराजांना विनंती केली, महाराज, तुम्ही कृपया माझे ऐका, तुम्ही खाली उतरा. माझे एवढे ऐका. महाराज त्यांचे ऐकून खाली उतरले. पुढे महाराजांवर खटला भरला कायद्याप्रमाणे जठारसाहेब होते त्यांच्यासमोर, त्यांनी फिर्याद घेतली. त्याची तारीख नेमली. बापूसाहेब जठार शेगावी चौकशीसाठी आले. शेगावमधल्या डाक बंगल्यात उतरले. व्यंकटराव देसाईसद्धा शेगावहून काही कामानिमित्त अकोल्याला आलेले. शेगावात महाराजांच्या खटल्याविषयी चर्चा चालू

होत्या. शेगावची मंडळी बंगल्याजवळ जमली होती. देसाई जठारांना म्हणाले, आज कोणता खटला आहे विशेष, म्हणून एवढी लोक इथे जमली आहेत. जठार म्हणाले अहो ह्या खटल्याचे कारण तुम्हांला कसे कळले नाही याचेच मला आश्चर्य वाटते आहे. तुमचे महाराज गजानन सगळीकडे नागवे फिरतात म्हणून पोलिसांनी त्यांच्याविरुद्ध खटला भरला. ह्या खटल्याची आज चौकशी होणार आहे. म्हणून हे गजाननभक्त इथे जमले आहेत असे वाटते. व्यंकटराव हे ऐकून खिन्न झाले. हात जोडून जठारसाहेबांना म्हणाले कृपया हा खटला चालवू नका. श्रीगजाननांचा अधिकार वेगळा आहे. ती मूर्ती साक्षात भगवंताची आहे. तो विदेही पुरुष आहे. त्याला कशाचे बंधन नाही हो. योग्यांचा योगिराज ते आहेत. खटला भरला हीच पोलिसांनी चूक केली. महाराज सर्वांना वंदनीय आहेत. ही चूक दुरुस्त व्हायला हवी. जठारसाहेब, आज तुम्ही ती दुरुस्त करा. जठार वकिलांना म्हणाले, तुम्ही कायदा जाणता, मग तुम्ही ह्याचा विचार आधी का नाही केला ?

कारकुनाला त्यांनी सांगितले की गजाननाला बोलावणे धाड. एक जवान पोलीस महाराजांना नेण्यासाठी पाठविला. तो समर्थांना म्हणाला, चला कचेरीत, अधिकाऱ्याने मला तुम्हांला बोलविण्यासाठी पाठवले आहे. बऱ्या बोलाने चला नाहीतर मला तुमच्या हाताला धरुन ओढून न्यायला लागेल. गजानन म्हणाले, आम्ही नाही उठणार येथून, तुझे शिपाईपण दाखव मला. ये, पकड माझ्या हाताला. त्यांनी शिपायाचा हात धरला, इतका घट्ट की त्याच्या हाताचा रक्तप्रवाह बंद झाला. शिपायाच्या हाताला कळ लागली. त्याचा जीव व्याकूळ झाला. शिपायाला वेळ लागला म्हणून अधिकाऱ्याने व्यंकटराव देसाई वकिलांना पाठविले महाराजांना आणायला. तेवढ्यात त्यांना निरोप आला की, शिपायाचा महाराजांनी कर धरला आणि त्याला एका जागेवर बसवले. मग देसाई तिथे आले आणि भक्तांना म्हणाले की,

''महाराजांना ह्यावेळी आपण धोतर नेसवूया''. भक्तांनी धोतर नेसविले. महाराजांनी ते तत्क्षणी सोडले.

समर्थ नागवेच कचेरीस गेले. त्यांच्याबरोबर भास्कर होता. महाराज बसले तिथे. जठारसाहेब म्हणाले महाराजांना ''तुम्ही सदैव नागवे का फिरता? रस्त्यावर नागवं फिरणं हा गुन्हा आहे कायद्याप्रमाणे''. समर्थांनी हे ऐकून स्मितहास्य केले. उत्तर देताना त्याला म्हणाले, ''तुला काय करायचंय रे, माझी चिलीम भर, पटकन. उगीच नसत्या निरर्थक गोष्टींना महत्त्व देऊ नकोस''. ते भाषण ऐकून जठार गेले विरघळून. जठारांनी पूर्ण विचार केला आणि त्यांनी हुकूम फर्माविला, ''महाराजांना जीवन्मुक्त ठेवणे व्यवस्थित हे भास्कराचे काम होते. पण त्याने ते नीट केले नाही''. म्हणून भास्कराला पाच रुपये दंड केला.

समर्थ भास्कराला म्हणाले, ''बघ ह्या पुढे आता आग्रह करु नकोस तुझी फजिती करुन घ्यायला''. भास्कर काही बोलला नाही. मौन धरुन राहिला.

असेच एकदा अकोल्याला बापूरावाच्या सदनी महाराज आलेले, त्याचवेळी यवन जातीचा साधु महेताबशा हा कुरुमगावी मूर्तिजापुराजवळ राहत होता. त्याने बापूरावांना सांगितले होते की, श्रीगजानन महाराज जर अकोल्यात आले तर मला नक्की सांगा. समर्थ अकोल्याला आल्यावर लगेचच बापूरावाने कुरुम गावी निरोप घेऊन माणूस पाठवला होता. त्याचवेळी महेताबशा हे अकोल्यासी येण्यास निघाले होते. निरोप घेऊन निघालेला माणूस त्यांना अर्ध्या वाटेत भेटला. त्यांनी त्या माणसाला सांगितले, अरे आता तू कुरुमगावी जाऊ नकोस. मीच आहे महेताबशा. बघा श्रोते हो, संताची थोरवी किती श्रेष्ठ. महेताबशासोबत दोन चार यवन होते. ते सर्व येऊन बापूरावाच्या सदनी उतरले होते.

दुसऱ्या दिवशी सकाळी लवकर महाराज महेताबशा जिथे निजले होते, तिथे आले. महाराजांनी तिथे त्याचे केस धरुन त्याला ताडिले. महाराजांचा उद्देश एवढाच होता की, यवन जातीमध्ये जन्म घेऊन काही उपयोग केला नाही. यवनाचे आडदांडपण अजून गेले नव्हते. महाराज म्हणाले, तुझे नाव महेताब आहे. त्याची कायम आठवण ठेव. वरचेवर हा द्वेषरुपी अंधकार वाढतोय, याची तुला माहिती नाही म्हणून तुला ताडले. असा इशारा मिळाल्यामुळे महेताबशा संतोषला. सोबतचे यवन हा सर्व प्रकार बघून कावरेबावरे झालेले. महेताबशा सोबतच्या यवनांना म्हणाला, तुम्ही आता इथे राहू नका, तर तुम्ही कुरुमगावी जा हे उत्तम.

बच्चुलालाने महाराजांना दुसऱ्या दिवशी भोजनासाठी बोलावले होते. तो म्हणाला मोठ्या थाटामाटात उद्या तुम्ही माझ्या घरी यावे अशी माझी इच्छा आहे. दुसऱ्या दिवशी, टांग्यात बसवून थाटामाटात त्याने महाराजांना घरी आणले पण महाराज टांग्यामधून खाली उतरले नाहीत. सर्व मंडळी तिकडची चिंताग्रस्त झाली की समर्थांनी असे का केले? काल आमंत्रण स्वीकारले, मग आता टांग्यामधून का खाली उतरत नाहीयेत?

त्यांतील एक हुशार म्हणाला, ''महेताबशाला वगळले ना म्हणून महाराज उतरत नाहीयेत. त्याला वगळलेले महाराजांना आवडले नाही. आता एकाच टांग्यात बसवून दोघांना आणा म्हणजे महाराज आणि ते दोघे आनंदाने येतील''. तेच वाक्य खरे झाले. दोघांनाही मिरवत आणले. महेताबशाला उतरविले थेटरात आणि महाराजांना श्रीरामांच्या मंदिरात, पण महाराज पण उतरल्यावर थेटरात गेले. सर्वांची भोजने झाली. मग महेताबशा म्हणाला लोकांना की, तुम्ही मला पंजाबचे तिकीट काढून द्या. शेख कडू म्हणाला, अहो

पण तुम्ही कुरुमच्या मशिदीला टाकून कसे जाता? ती मशीद पूर्ण बांधा आणि मग जा तुम्ही पंजाबला. असे अर्धवट काम टाकून जाऊ नका.

महेताबशा प्रेमाने शेख कडूस म्हणाले, ह्यावेळी आग्रह धरु नका. कारण तो निरर्थक ठरेल. समर्थांच्या कृपेने मशिदीचे काम पूर्ण होईल नक्की, हे आहे माझे वचन. धर्माविषयी द्वैतभाव संतांच्या मनात नसतो कधीही. मशीद व देऊळ हे समान आहे. आकाराने फक्त भिन्न आहे. यवन फक्त खुदाचा आणि हिंदू भुताचा, असे होत नाही. पोक्त विचार करा. मनुष्यपण टिकवा. हिंदू व मुसलमान हे एकाच देवापासून निर्माण झाले आहेत. महेताबशा निघून गेले.

हे जे बापूराव होते त्यांच्या पत्नीला भानामतीची बाधा होती. किती उपाय केले तरी ते वाया गेले. अंगामध्ये जळजळ, मळवट यावा घटकेत, घटकेत वस्त्राला अग्नी लागत असे, पाठीवर बिब्याच्या फुल्या येत असत. या भानामतीमुळे त्या बापूरावाची बायको क्षीण होऊन गेलेली. भानामती काढणाऱ्यालासुद्धा अकोल्याहून बोलावले होते. पण त्रास मुळीच कमी झाला नाही. शेवटी बापूरावानं गजानन महाराजांसमोर हात जोडले. ते म्हणाले मी कंटाळलोय. तुम्ही माझ्या घरी या आज गुरुवरा. महाराज त्यांच्या घरी गेले आणि त्यांच्या पत्नीचा भानामतीचा त्रास पूर्ण नाहीसा झाला.

एकदा असेच फिरत-फिरत महाराज आकोल्याला त्यांचे बंधू नरसिंगजी ह्यांना भेटण्यासाठी आले. त्यांच्या मठाच्या बाजूला एक विहीर आहे. त्या विहिरीवर जाऊन महाराज बसले. पाय आतल्या बाजूला सोडून विहिरीत डोकावून बघू लागले. अशी कृती बघून लोक मनातून संशयित झाले. नरसिंगजींनी विचारले, अरे हे काय करतोयस? महाराज म्हणाले गोदा, यमुना, भागीरथी येथे आहेत तुमच्यासाठी अजून किती तीर्थे आहेत हे डोकावून पहातोय. तुला त्यांचे स्नान घडते. मग मी का राहू तसाच, या तीर्थांनी येऊन आज मला

स्नान घालावे. मला त्यांनी आज जोपर्यंत इथे येऊन स्नान घालत नाहीत. तोपर्यंत मी इथून हलणार नाही.

हे भाषण ऐकून कित्येक जण म्हणाले, अरे हा खरंच वेडा आहे. जरा थांबून बघूया हा काय करतो पुढे.

तेवढ्यात विहीरीतील पाण्यात असंख्य अशा लाटा उमटल्या. विहीर पाण्याने पूर्ण भरली. हजारो कारंजी पाण्यातून वर उडाली. गजाननाच्या अंगावर पाण्याचे फवारे उडू लागले. गंगा-यमुना महाराजांना स्नान घालण्यासाठी वरती आल्या. काय हे दृश्य सुरेख आहे.

भाविकांनी केले स्नान,<br>
निंदकांनी खाली घातली मान,<br>
स्नान होता समर्थ उठले.<br>
परत पाणी तळाशी गेले.

नरसिंगजींना भेटून महाराज परत शेगावी वायुवेगाने गेले. अशाप्रकारे श्रीगजानन विजय ग्रंथ कथासाराचा सतरावा अध्याय इथे पूर्ण होतो.




**धवलदंती**

दातांच्या मजबूतीसाठी, दातांच्या तक्रारिंवर चिमूटभर धवलदंती पावडरने रोज सकाळी ब्रश करण्यास सांगितले जाते. कफाचा चिकटा कमी होऊन मुखरोग कमी होण्यास, पचन सुधारण्यास धवलंदतीचा उपयोग होतो.

# श्रीगजानन विजय कथासार - अध्याय १८वा

श्रीगणेशाय नमः । भक्तांच्या मनामधील सहज तुला समजते भगवंता, भक्तांच्या सर्व इच्छा पूर्ण करतोस. अशा परमेश्वराला माझे साष्टांग नमन.

मुंडगाव जे आकोटाच्या शेजारी होते. तिथे बायजा म्हणून समर्थाची खरी भक्त होती. हळदीमाळ्याच्या वंशात तिचा जन्म झाला होता. शिवराम तिचे वडील व भुलाबाई तिची आई. बायजाचे लहानपणीच लग्न झाले. विधाता जे ठरवतो, तेच घडत असते. बायजा हळूहळू मोठी होऊ लागली. तारुण्यात तिचा गर्भाधान संस्कार झाला. मग भुलाबाईने शिवरामांना सांगितले की, आता हिला नवऱ्याच्या घरी सोडा. पण उपयोग झाला नाही. बायजाचा नवरा षंढ होता. बायजाच्या आई-वडिलांना खूप दुःख झाले. बायजाकडे बघून तिच्या आईला अक्षरशः रडायला यायचे. भुलाबाई बायजाच्या वडिलांना म्हणाली की, ''आपण हिला असेच न ठेवता, आपण तिचे दुसरे लग्न करुन देऊ''. वडील म्हणाले की, एवढी घाई नको करुस. थोडे दिवस बायजाला इथेच राहू दे. मग थोडे दिवस सासुरवाडीला पाठवू. तिच्या नवऱ्याला नपुंसकत्वावर औषध देऊ. मग थोडे दिवसांनी बायजाला सासरी पाठवले.

१५-१६ वर्षांची बायजा होती. वर्ण काळासावळा होता. पण बांधा सुरेख होता. डोळे पाणीदार. जिला पाहताच कोणाचीही कामभावना जागृत होईल अशी दिसायला सुंदर होती बायजा. बायजाच्या थोरल्या दिराची वाईट नजर होती तिच्यावर. तिच्याबरोबर संभोग करण्याची इच्छा होती. हरप्रकारे त्याने बायजाचे मन वळवण्याचा प्रयत्न केला. तुझे कायम संगोपन मी करेन, तुझे सर्व हट्ट

मी पुरवेन, पण मलाच आजपासून तुझा नवरा समज. पण बायजाचे मन स्वच्छ होते. ती ‘नारायणा’ भगवंताला म्हणे की, हे काय दैन्य मांडलेस? बालपणापासून तुझ्या चरणांची मी पूजा करते, त्याचे हे फळ आहे का? ज्याचा मी हात धरला तो नेमका पुरुष नव्हता ह्यात माझी काय चूक? तो दैवयोग होता. संसार नाही नशिबी म्हणून मन तुझ्या भक्तीत रमवले. कृपा कर आता. स्पर्श पुरुषाचा आता मला न होवो.

एके दिवशी तिचा दीर तिच्याशी लगट करु लागला. म्हणाला, अविचार सोडून दे, तिच्या अंगावर तो हात टाकणार एवढ्यात मोठ्या दिराचा मोठा मुलगा माडीवरुन पडला खाली. त्याच्या डोक्यावर खोक पडली. बायजाने त्याला धरले. मांडीवर बसवून औषध लावू लागली मुलाला. बायजा आपल्या मोठ्या दिराला म्हणाली, परस्त्रियांचा अभिलाष बरा नव्हे. मुलगा पडलेला पाहून दीरही मनातून घाबरलेला. पुढे शिवराम मुलीला घेऊन मुंडगावी गेला. भुलाबाई नवऱ्याला म्हणाली, ‘‘चला आता आपण शेगावी जाऊया, महाराजांचे दर्शन घेऊया. महाराजांनाच विचारुया, बायजाच्या भाग्यात नेमके काय लिहिले आहे ते’’. तिथे शेगावी पोहोचल्यावर बायजाने महाराजांना नमस्कार केला. शिवराम महाराजांना म्हणाला, ‘‘महाराज, हिला पुत्रपुत्री द्या’’. महाराजांनी ते ऐकले व हसून म्हणाले, अरे विधात्याने हिच्या नशिबी संततिसुख नाही दिले. उगीचे हिचे लग्न करण्याच्या फंदात तू पडू नकोस. हे ऐकता शिवरामाला अतीव दुःख झाले पण, बायजा समर्थवचनामुळे मनातून आनंदित झाली. ते परत मुंडगावी गेले. बायजाची निष्ठा गजाननाच्या चरणी जडली. तेव्हापासून पुंडलिक नावाचा महाराजांचा जो भक्त होता. त्याच्याबरोबर बायजा शेगावी जाऊ लागली. आधी पहिले आई-वडिलांनी तिला अडविले नाही.

त्यांना वाटले की, साधुचरणी हिचे भले होईल. पुरुषत्व मिळेल जावयाला. संतांना काही अशक्य नाही. अशा विचार करुन ते शांत होते.

बायजा पुंडलिकासह शेगावी जात होती म्हणून गावात उगीच चर्चा पूर आला. हे नुसते वारीचे ढोंग आहे. ह्यांची एकमेकांवर प्रीती जडली आहे. सुख उपभोगण्यासाठी बहुतेक युक्ती केली दोघांनी.

पुंडलिक होता मराठा म्हणून त्यांच्या दृष्टीने बायजाचा हात धरण्यासाठी हा संबंध योग्य नव्हता. कारण बायजा जातीने माळी होती. बायजा व पुंडलिकाचे मन स्वच्छ होते. असा अविचार अजिबात दोघांच्या मनात नव्हता. भुलाबाई बायजाला म्हणाली, तू सतत त्या पुंडलिकाच्या घरी का जातेस? ऐन तारुण्यात कुठला गं तुमचा परमार्थ? उसाच्या शेतात कोल्हा उपाशी राहील का? सांग मला. उगीच आमच्या नावाला काळिमा फासू नकोस गं. भुलाबाई नवऱ्याला म्हणाली, आता हिला असे ठेवणे योग्य नाही. तुम्ही माळ्याचा एखदा मुलगा बघा व हिचे लग्न लावून द्या. ही पुंडलिकाच्या घरी जाते सतत. एकमेकांना बघून त्यांना प्रेमाचे भरते येते. चला हिला घेऊन जाऊया शेगावी महाराजांसमोर, महाराजांना सर्व काही समजते.

बायजा, तिचे आई-वडील, पुंडलिक भोकरे असे चौघे शेगावी आले. समर्थांना नमस्कार केला चौघांनी.

पुंडलिकाकडे बघून महाराज म्हणाले, ''पुंडलिका, ही बायजा तुझी पूर्वजन्मीची बहीण आहे. लोकांनी निंदा केली तरी तू तिला कधीही अंतर देऊ नकोस. दोघेही अशीच भक्ती करा सच्चिदानंदाची''.

भुलाबाईला महाराज म्हणाले, अगं ए, तुझ्या लेकीला भलता

दोष लावू नकोस. हे दोघे पूर्वजन्मीचे बहिणभाऊ आहेत आणि ह्या जन्मी बायजाला नवरा मिळणार नाही. कारण ती या जगामध्ये संसार करण्यासाठी आली नाहीये. ही आयुष्यभर कुवारी राहिल. जशी जनाबाई पंढरपुरी. तिने नामदेव गुरु केला होता, तशी बायजा आम्हाला शरण आली. आता कोणीही हिला कधीच त्रास देऊ नका. शिवराम लेकीला घेऊन मुंडगावी परत आला. मात्र त्यानंतर बायजाच्या वारीला कोणीही अडथळा केला नाही.

महाराज कायमच आपल्या भक्ताचे रक्षण करतात. भाऊ राजाराम कवर म्हणून खामगावच्या दवाखान्याचा अधिकारी होता. त्याला एक दुर्धर फोड झालेला. त्याच्यावर उपचार करण्यासाठी मोठ्या डॉक्टरांना आणले. बुलढाणा, अकोला, अमरावती अशा ठिकाणहून वेगवेगळे डॉक्टर आणले त्या दुर्धर फोडावर शस्त्रक्रिया करण्यासाठी, पण कसलाच इलाज त्या फोडावर चालला नाही. दिवसेंदिवस तो फोड वाढत होता. मोठ्या भावाला लहान भावाच्या दुखण्याची काळजी पडली. शय्येवरती तो तळमळत होता. वेदना त्यांला असह्य झालेली. वेगवेगळी औषधे दिली. पोटिस बांधले. शस्त्रक्रियाही केली, पण कशाचा उपयोग होत नव्हता. शेवटी त्याने असा विचार केला की, आता सद्‌गुरुंशिवाय नाही पर्याय. पडल्या पडल्या, शय्येवरून त्याने सद्‌गुरुनाथांचा धावा सुरु केला. म्हणाला, ''आता अंत नका पाहू भक्ताचा''. रात्रीचा एक वाजून गेलाला, आकाशात गडद काळोख, तेवढ्यात एक दमणी आली. बैलांच्या गळ्यातील घुंगुरमाळांचा आवाज येत होता, दमणीला पडदा होता. दवाखान्याच्या दारापाशी दमणी आली. डॉक्टर तिला पाहत होता. तेवढ्यात त्यातून एक ब्राम्हण उतरला. डॉक्टरांच्या बंगल्याचे दार ठोठावू लागला. डॉक्टरांच्या भावाने दार उघडले. विचारलं त्यांना,

''कुठून आलात तुम्ही''. ब्राम्हण म्हणाला, माझे नाव 'गजा' तीर्थ व अंगारा घेऊन शेगावहून आलो आहे. डॉक्टर भाऊ कवराला जो फोड झाला आहे. त्याा फोडाला लावण्यासाठी अंगारा व प्यायल तीर्थ दिले आहे. हे घ्या तुमच्या हातात. आता मी परत जातो. तीर्थ देऊन तो निघून गेला.

भावाने त्याल शोधण्यासाठी शिपाई पाठविला. पण तरी त्याचा पत्ता न लागला. भावांना मनी तर्क लागेना. फोडाला अंगारा लावताच तो तत्काळ फुटला. पू येऊ लागला. एक घटका होऊन गेल्यावर पू यायचा थांबला. पाहा, समर्थांच्या अंगाऱ्याचा किती आहे जोर ! भाऊला निद्रा लागली. पुढे व्याधी बरी झाली. हळूहळू शक्ती आली भाऊला. तो पूर्ववत झाला. महाराजांच्या दर्शनाला तो शेगावी गेला, तेव्हा समर्थ म्हणाले, ''अरे माझ्या बैलांना तू चारासुद्धा दिला नाहीस''. ह्या सांकेतिक भाषणाने भाऊचे हृदय उंचबळून आले. त्या रात्रीचा ब्राम्हण म्हणजे साक्षात माझे महाराज होते. लेकरासाठी खास खामगावी धावून आलेले. कवराने व्याधी बरा झाली म्हणून अन्नदान केले.

एकदा महाराज पंढरपुरास निघालेले विठ्ठलाची भेट घेण्यासाठी. बरोबर भक्तमंडळी होती. वारीचे दिवस होते. खास पंढरपुरासाठी सतत गाड्या होत्या. जगुआबा, पाटील हरी, बापुना व मंडळी शेगाव सोडून नागझरीला आले होते. त्या गावात माळावर एक भुयार आहे. तिथे गोमाजी नामक साधूने समाधी घेतली होती. जिवंत पाण्याचे झरे आसपास होते. म्हणून त्या गावाचे नाव नागझरी पडले होते. हे गोमाजीबोबा हे महादाजी पाटलाचे गुरु. प्रथम आशीर्वाद त्यांना मिळाला. म्हणून शेगावचे लोक प्रथम नागझरीला येऊन गोमाजी यांना वंदन करून पंढरीला जात असत.

हरी पाटील यांच्याबरोबर समर्थ, बापुना काळे व इतर मंडळी

होती. आषाढ शुद्ध नवमीचा तो दिवस होता. वारकऱ्यांचे वेगवेगळे समुदाय येत होते. तेवढ्यात आकाशात काळे ढग दाटले आणि पर्जन्यवृष्टी होऊ लागली कुठेतरी भूमीवर. पंढरपूर गजबजून गेलेले. जय जय रामकृष्ण हरी असा गजर ऐकू येत होता. सगळीकडे आनंदाचे वातावरण होते. संतांच्या पालख्या पंढरीला आल्यावर भक्तांनी बुक्का उधळिला. आकाशात जणू बुक्क्याचे छत झालेले. सुवास फुलांचा पसरलेला. अशावेळी समर्थांचे पंढरपुरात आगमन झाले. समर्थ कुकाजीच्या वाड्यावर उतरले होते. दर्शनासाठी मंदिरात खूप गर्दी होती. रस्त्यावर पोलीस उभे होते. बापुना हरी पाटलाबरोबर न जाता इतर बाकी मंडळी दर्शनासाठी गेली. बापुना स्नानासाठी गेलेला म्हणून तो मागे राहिला. सगळे दर्शनासाठी गेले आहेत हे पाहून तो पण लगेच निघाला. पण एवढी गर्दी झालेली की, मुंगीलाही वाट मिळणार नाही. बापुना म्हणाला हे विठ्ठला, का रे माझ्याशी निष्ठुर झालास? सावत्यासाठी त्याच्या मळ्यात गेलास. मला का उपेक्षिलेस तू? अनाथांचा नाथ आहेस ना? त्याने भरपूर धावा केला पण मग हताश होऊन घरी परत आला. चेहरा पडलेला व संपूर्ण दिवसाचा उपास झालेला. सर्वजण बापुनाला बघून हसू लागले. हा बिचारा अभागी आहे असे म्हणू लागले. बापुनाचे शरीर घरी होते पण मनाने अजूनही तो विठ्ठल मंदिराजवळ होता.

लोक वेगवेगळे तर्क मांडत होते की, बापुनाच्या हृदयातच देव आहे. दर्शन नव्हते घ्यायचे तर हा पंढरपुरी का आला? किती दुर्दैवी आहे हा बापु. अशा अनेक गोष्टी लोक त्याला ऐकवत होते. बिचारा बापुना आधीच उपोषित बसलेला. स्वामी गजानन हे सगळं दुरुन बघत होते. ते बापुनाला म्हणाले, की उगीच तू दुःख करु नकोस. ये, रुक्मिणीरमणाशी तुझी भेट घडवतो. महाराज उभे राहिले, करेवर

हात ठेवले. पाय खाली जुळवले समचरण दाखवायला. तुळशी फुलांच्या माळा गळ्यात घातलेली मूर्ती बापुनाच्या दृष्टीसमोर आली. बापुनाने चरणावर डोके ठेवले. पुन्हा वर बघितले तर गजाननस्वामी दिसले. ते सर्व बघून बापुना खूप आनंदला. दिवसभराचा सर्व शीण निघून गेला. जे धोतर, पागोटे व शेला बापुनाला घरी दिसला, तोच त्याला देवळात दर्शनासाठी गेल्यावर दिसला. इतर सर्वजण महाराजांना विनवू लागले की, ''आम्हाला पण दर्शन होऊ द्या. असे भाषण ऐकता महाराज म्हणाले, त्यासाठी आधी बापुनाप्रमाणे तुमचे मन हवे अधीर तसे आधी मन करा. मग दर्शन घडवेन मी तुम्हांला. निष्पाप करा मन बापुनासारखे''. बघा महाराजांनी बापुनाला साक्षात विठ्ठलदर्शन घडवले. काल्याचा प्रसाद घेऊन भक्तमंडळी माघारी परतली. बापुनाच्या अंतरात विठ्ठलदर्शनाचा ठसा उमटला. त्याला पुत्र झाला तोही रसिक, चतुर, विद्वान. पंढरीच्या प्रसादाने बापुनाला पुत्र झाला. म्हणून त्याने पुत्राचे नाव नामदेव ठेवले.

कवठे बहाद्दूर गावाचा माळकरी होता. वऱ्हाड प्रांताचा असल्याने कुकाजीच्या वाड्यात उतरला होता. तेव्हा पंढरपुरात मरीची साथ होती. प्रेतामागून प्रेते येत होती. पोलीस घरी जाऊन तपास करून यात्रेकरुला चंद्रभागेच्या पलीकडे सोडत होते डॉक्टरांच्या हुकुमावरून.

कवठे बहाद्दूरचा वारकरी होता. तो मरीने आजारी झालेला, उलटी थांबत नव्हती. हातापायात गोळे येत होते. त्याची शुश्रूषा कोणी करत नव्हते. पोलीसांच्या भीतीने हे वृत्त कोणाला सांगितले नव्हते. वाडा घटकेत मोकळा झालेला. हा वारकरी मात्र तिथेच पडलेला. कठीण प्रसंगी संताशिवाय कोण मदत करणार ?

गजानन महाराज म्हणाले, ‘‘जो ओसरीवर निजला आहे त्याला घेऊन चला!’’ भक्त म्हणाले, ‘‘महाराज, त्याच्या नादी लागण्यात अर्थ नाही’’. महाराज सगळ्यांना म्हणाले, ‘‘तुम्ही कसे खुळावलात? देशबंधूला सोडता हे काही बरे नव्हे’’. असे म्हणून वारकऱ्याच्या जवळ जाऊन त्याच्या कराला धरुन त्याला उठवून बसविले. मधुर भाषण करुन म्हणाले, ‘‘चला वऱ्हाडप्रांता जाऊ’’. वारकरी म्हणाला, ‘‘गुरुनाथा! आता वऱ्हाड कशाचे हो? माझा अंत समीप आला आहे. जवळ कोणीच नाही आता आप्त. सद्‌गुरुनाथा, आता तुम्हीच वाचवा मला’’! महाराज म्हणाले, आता अजिबात घाबरु नकोस, तुझे गंडांतर आता टळले आहे. असे म्हणून महाराजांनी त्याच्या शिरावर हात ठेवला. तशी ढाळउलटी बंद झाली त्याची. त्याला शक्ती वाटू लागली. संतांनी ज्याचा हात धरला त्याला यम कसा नेईल? पंढरीची वारी करुन सर्व मंडळी शेगावी परत आली.

एक दिवस एक कर्मठ ब्राम्हण शेगावी दर्शन घेण्यासाठी आलेला फार लांबून. सोवळे ओवळे अतिशय होते त्याचे. समर्थांना बघून तो मनात खट्टू झाला. लोक ह्या दिगंबर वेड्यापिश्याला साधू म्हणतायत? अनाचाराचं राज्य आहे हे. तेवढ्यात, मठामध्ये काळे कुत्रे मृत झाले होते. त्याचे प्रेत येण्याजाण्याच्या वाटेवर पडले होते. त्या श्वानाला बघून तो अजूनच खिन्न झाला. ह्या श्वानाला कसे देऊ जीवन? असा विचार तो ब्राम्हण करत होता. मी उगाचच आलो इथे ह्याचे दर्शन घेण्यासाठी. त्याचा संशय मोडण्यासाठी गजानन महाराज आसनावरुन उठले व म्हणाले, अरे तो कुत्रा मेला नाहीये उगाच संशय घेऊ नकोस. ते ऐकून तो रागावला. समर्थांना म्हणाला, मला तुझ्यासारखे वेड नाही लागले. कुत्रे मरुन एक प्रहर झालाय. समर्थ म्हणाले खंत नका करु, आमच्याबरोबर पाणी आणण्यासाठी घेऊन चला घागर.

समर्थ लगेच निघाले. कुत्र्याजवळ आले. त्याला महाराजांच्या पायाचा स्पर्श होताच कुत्रे उठून बसले.

तो चमत्कार बघून ब्राम्हण निरुत्तर झाला. म्हणाला, गजानन महाराज थोर देवाप्रमाणे आहेत. त्याने महाराजांना वंदन केले. म्हणाला, मी अनंत अपराधी आहे. पण तुमचा वरदहस्त माझ्या शिरावर ठेवा. त्याच्या मनातील कुशंका पार फिटली. प्रसाद घेऊन तो त्याच्या देशी परत गेला.

अशा प्रकारे गजानन विजय ग्रंथ कथासाराचा अठरावा अध्याय इथेच समाप्त झाला.



# श्रीगजानन विजय कथासार - अध्याय १९वा

श्रीगणेशाय नमः । अनन्य भावाने तुझे स्मरण गजानना आम्ही करतो, दीनवाणी तुला हाक मारतो, मला दगा देऊ नका. हे जगन्नाथा, तू पाव आम्हांला । महाराज जेव्हा शेगावात होते, तेव्हा काशीनाथ गर्दे नावाचा गृहस्थ महाराजांच्या दर्शनासाठी आला होता. त्याने आल्यावर महाराजांचे दर्शन घेऊन त्यांच्या चरणांना स्पर्श केला. माझ्या वडिलांनी जी जीवन्मुक्तीची लक्षणे अनुभवाने लिहिली त्यांची ही प्रत्यक्ष मूर्ती आहे. माझे भाग्य खरेच थोर, म्हणून आज मला त्यांचे दर्शन झाले. खामगावहून इथे आलो त्याचे सार्थक निश्चित झाले. समर्थांनी तेवढ्यात लीला केली. काशीनाथाच्या पाठीला परमेश्वरकृपेने कोपरखळी मारली. जा, तुझा हेतू पुरविला. तारवाला बघ तुझी वाट पाहत असेल. ह्या भाषणाने, काशीनाथ मनी घोटाळला. म्हणाला, महाराज, मी इथे काही मागण्यासाठी आलो नाहीये. मग तारवाला शिपाई का वाट पाहतोय? त्याचे गूढ त्याला उमजत नव्हते आणि महाराजांना विचारण्याचा धीर होत नव्हता. निमूटपणे महाराजांना नमन करुन तो खामगावी परतला. तिथे जाऊन बघतो तर तारवाला शिपाई दारात उभा होता. त्याने घाईघाईने तार हातात घेतली, काय मजकूर लिहिला आहे हे बघायला. तारेत असा मजकूर लिहिलेला की, तुमची नेमणूक मुनसफीच्या हुद्द्यावर मोर्शी तालुक्यामध्ये केली आहे. ते बघून काशीनाथ खूप आनंदला आणि आता त्याला समर्थांच्या कोपरखळीचा अर्थ समजला. नागपूरमध्ये एकदा समर्थ गोपाळ बुटीच्या घरी गेले होते. सीताबर्डी येथे वाडा होता. भव्य सदनामध्ये त्याने महाराजांना नेऊन ठेवले आणि त्यांना शेगावी जाऊ देत नव्हता. अक्रूराने जसे कृष्णाला मथुरेमध्ये थांबवून ठेवलेले अगदी तसे. शेगावीचे लोक दुःखी झालेले. ते हरी पाटलाला विनवीत होते की,

''महाराजांना इथे आणा हो. समर्थांवाचून शेगाव हे प्रेतवत आहे''. सर्व म्हणाले, तुम्ही जा ना नागपुरास आणि समर्थांना घेऊन या.

इकडे नागपुरात महाराज बुटीला म्हणाले की, मला शेगावी जाऊ दे, तुझ्या सदनामध्ये मला डांबून ठेवू नकोस. ते बुटी ऐकत नव्हता.

बुटी भाविक असला तरी श्रीमंतीचा गर्व होता. रोज ब्राम्हणभोजन समर्थांपुढे घालत होता पण शेगावचे लोक जर दर्शनासाठी येत असतील तर त्यांना दर्शनासाठी येऊ देत नसे.

इकडे हरी पाटील काही भक्तमंडळींना बरोबर घेऊन नागपुरी निघाला, समर्थांना शेगावी आणण्यासाठी. त्याचवेळी इथे महाराज म्हणाले, ''अरे गोपाळा, माझा हरी निघाला आहे नागपुरी यायला, तो येण्याच्या आत मला इथून जाऊ दे. तो इथे आल्यावर शांतता नाही राहणार. कारण तो जमेदार आहे. तुझ्या धनाच्या उड्या ह्या राहतील निर्धारी. तो त्याच्या मनगटाच्या बळावर मला इथून घेऊन जाईल''.

हरी पाटील तिथे आला, तसे शिपायाने त्याला अडवले ते त्याने मानले नाही. गोपाळ बुटीच्या घरी पंगत जेवायला बसली होती. ब्राम्हण जेवायला बसले होते. चांदीची ताटे, शिसमचे पाट असा सारा थाट होता. जणू कुबेर प्रांतीचा बुटी हा कुबेर होता. हरी पाटील आत सदनात आला. महाराज त्याला दारात भेटण्यासाठी धावत निघाले. वासराला बघून गाय कशी धावते अगदी तसे.

महाराज हरीला म्हणाले, ''हरी, मला इथे नाही राहायचे. चल आपण शेगावी जाऊ. समर्थ जाऊ लागले हे गोपाळ बुटीने पाहिले. अनन्य भावनेने त्याने महाराजांचे चरण धरले''. गुरुराया, दोन घास जेवून जा असे विनवू लागला. मग नक्की तुमच्या इच्छित स्थळाला जा. हरी पाटलाला पण सांगितले की, तुम्हीसुद्धा प्रसाद घेऊन जा.

महाराज इथे राहणार नाहीत हे माझ्या लक्षात आले आहे. माझी चूक मला समजली आहे. माझी लाज तुम्ही राखा. समर्थ आत्ता निघाले तर लोक उपाशी पंगतीवरुन उठतील. अवघ्या नागपुरात माझ्यावर टीका होईल. महाराज थांबले. शेगावची समस्त मंडळी पण पंगतीमध्ये जेवली. भोजनोत्तर निघायाची तयारी झाली. पण दर्शनासाठी खूप गर्दी झालेली. जानकीबाई ह्या बुटीच्या घराच्या गृहलक्ष्मी होत्या. तिने महाराजांच्या चरणी नमन केले व म्हणाली, महाराज, माझ्या मनीचा हेतू पुरवा. महाराज म्हणाले, ''मी तुझ्या मनीचा हेतू जाणला आहे तो पूर्ण होईल''. असे म्हणून महाराजांनी तिच्या कपाळाला कुंकू लावले. अजून एक सद्‌गुणी असा तुला पुत्र होईल असा आशीर्वाद देऊन महाराज सीताबर्डीहून निघाले. रघूजी भोसले ह्याच्या घरी उतरले. हा मनाचा भाविक व स्वभावाने उदार होता. उत्तम प्रकारचा आदर त्याने महाराजांचा केला. पुढे रामटेकला महाराज गेले व रामरायाचे दर्शन घेऊन शेगावच्या मठात परत आले.

श्री वासुदेवानंद सरस्वती, कर्ममार्गावर ज्यांचे प्रेम, कृष्ठातटाका ज्यांची महती, माणगावी त्यांचा जन्म झाला. ते येण्याची सांकेतिक खुण महाराजांना समजली. त्यांनी बाळा भाऊला सांगितले, माझा एक भाऊ येतोय गुरुवारी. कर्मठ आहे तो पण, त्याचा योग्य तो आदरसत्कार करा. चिंध्या कुठे पाडू नका. नाहीतर तो रागवेल. अंगण स्वच्छ ठेवा. तो कऱ्हाडे ब्राम्हण आहे. शुचिर्भूत आणि ज्ञानसंपन्न आहे. दुसऱ्या दिवशी एक वाजेपर्यंत महाराजांचे बंधू आले. वासुदेवानंदाना पाहून महाराजांना आनंद झाला. दोघे एकमेकांना बघून हसले. एक कर्माचा सागर तर एक योगेश्वर. एक मोगरा तर एक गुलाब. एक गंगा तर एक भागीरथी. स्वामी जेव्हा मठात आले तेव्हा महाराज आपल्या पलंगावर बसले होते. चिटक्या कराने वाजवत होते. जसे स्वामी आले तशी चिटकी थांबली. दोघांची दृष्टादृष्ट झाली.

स्वामींनी परत जाण्यासाठी आज्ञा घेतली. महाराजांनी फार बरे म्हणून मान डोलावली. स्वामी निघून गेले. बाळाभाऊला ह्याचे कौतुक वाटले. तो म्हणाला, गुरुराया, हे दृश्य पाहून मनामध्ये संशय आला आहे. त्याचे निवारण करा ना, समर्थ म्हणाले, बाळा प्रश्न बरा केलास, आज. ईश्वराकडे जाण्याचे म्हणजे मोक्ष मिळवण्याचे तीन मार्ग आहेत. हे तिन्ही मार्ग एकाच गावा जाऊन मिळतात. त्याचे स्वरुप बघणाऱ्याला वेगवेगळे दिसते आणि वरुन बघणाऱ्यांचे मन घोटाळते. सोवळे, ओवळे, व्रत, उपोषणे ही अंगे आहेत कर्माची. ही तत्त्वे जो आचरणात आणतो तो ब्रम्हवेत्ता कर्मठ.

भक्तिमार्गाचे जो आचरण करतो त्याचे मन शुद्ध असायला हवे. मलिनता अंशरुपामध्ये, पण मनात यायला नको. भक्तिमार्गात, दया, प्रेम, लीनता असे गुण असतात. मुखामध्ये सतत नामस्मरण असते. ह्या अंगांसह जर भक्तिमार्गात भक्त लीन असेल तर त्याला श्रीहरी निश्चित भेटतो. भक्तिमार्गाची सर कोणत्याही मार्गाला नाही, पण त्याचा विधी सोपा नाही. कर्ममार्गाहून कठीण आहे निश्चित.

योगमार्ग हा तिसरा, जो कर्ममार्ग व भक्ति मार्गाहून असतो वेगळा. ज्याच्याकडे योग मार्ग असतो त्याला अजून काही लागत नाही. जेवढे आहे ब्रम्हांडात तेवढे आहे पिंडात, त्या पिंडामधील साहित्य घेऊन योग करावा. कुंडलिनी व सुषुम्नेचे ज्ञान हवे. काळा, गोरा, खुजा, थोर हे भेद शरीरासाठी असतात, आत्म्यासाठी नाही.

ह्या तिन्ही मार्गांचे फळ ज्ञान असते. व्यास, नारद, मारुती, पार्थ, विदुर हे भक्तिमार्गाने पुढे गेले. शंकराचार्य, मच्छिंद्र, जालंदर ह्यांनी योगमार्गाचा स्वीकार केला. वसिष्ठ, वामदेव, जमदग्नी, पराशर, शांडिल्य ह्यांनी कर्ममार्गा अवलंबन केले. कर्म मार्गाची बाजू श्रीपादवल्लभांनी रक्षिली. अशी अनेक उदाहरणे आपल्याला इतिहासात मिळतात.

सर्व संतांचे आचरण वेगळे आहे पण तरी ते सर्व कैवल्याचे होऊन बसलेत. कोणी काही म्हणाले तरी आपण निवांत असावे. अंतरमनाचा आवाज ऐकावा. बाळा भाऊच्या नेत्रांना प्रेमाश्रूंचा पूर आला. अष्टभाव दाटून आले. शरीरावर रोमांच उठले. मौनाने त्याने महाराजांना नमस्कार केला.

श्रीगजानन साधू हे थोर आहेत. वऱ्हाड प्रांताचा उद्धार करण्यासाठीच अवतरले आहेत.

साळूबाई म्हणून कण्व शाखेच्या, महाराजांच्या भक्त होत्या. जे भक्त यायचे त्यांना साळूबाई जेवायला घालत असत. डाळपीठ घेऊन अहोरात्र स्वयंपाक करत असत. सर्व भक्तांना नारायण समजून ती सर्वांसाठी प्रेमाने जेवण बनवत असे. ती साळूबाई वैजापूरची अजून आहे मठात.

प्रल्हादबुवा जोशी यांना कृपेचा योग आलेला पण तो अजून फलप्रद नव्हता झाला. खामगावाच्या जवळ एक जलंबगाव होते तिथे तुळशीराम राहत होते. त्यांच्या मुलाचे नाव आत्माराम. तैलबुध्दीचा होता. वेदवेदांगाची त्याला आवड होती. कधीकधी शिक्षणासाठी जाऊन मुले मौजमजा, चैनीच्या गोष्टी करण्यातच दंग होतात, पण आत्माराम तसा नव्हता. तो काशीला वेदाध्ययनासाठी गेला. काशीहून परत येताना तो शेगावी महाराजांच्या दर्शनासाठी गेला.

महाराजांना नमस्कार करुन वेदांमधील विविध श्लोक तो म्हणू लागला. तसे महाराज त्याच्या ज्या ज्या चुका होत होत्या त्या दुरुस्त करत होते. आत्माराम ते ऐकून मंत्रमुग्ध झाला. नंतर तो महाराजांच्या सोबतच राहिला. मधमाशीला मधापासून लांब राहता येईल का सांगा ?

प्रत्येक दिवशी तो जलंबहून पूजेसाठी यायचा. याच्यात त्याने खंड नाही केला. तो खरंच एकनिष्ठ भक्त होता. महाराजांच्या पश्चात तोच होता मठात, महाराजांच्या समाधीची पूजा-अर्चा करण्यासाठी. आत्माराम हा खरंच एकनिष्ठ भक्त होता. शेवटी त्याने त्याचे घर, थोडी जागा अशी इस्टेट समर्थचरणीच अर्पण केली. किती दिले हे महत्वाचे नसून त्या पाठीचा भाव हा महत्वाचा आहे. भिल्लिणीने नाही का रामाला उष्टि बोरे दिली. तसाच काही प्रकार हासुद्धा आहे.

आत्माराम पहिला, दुसरा स्वामी दत्तात्रेय केदार आणि तिसरे नारायण जामकर जे केवळ दुधाचे सेवन करीत ते दुधाहारी बुवा. श्रोते हो, हे तिघेजण स्वामींचे भक्त निर्वाण. ज्यांनी आपले तन-मन समर्थांच्या चरणी अर्पण केले.

मोरगावात, मारुतीपंत म्हणून समर्थांचा भक्त होता. त्याच्या शेतामध्ये पिकांचे रक्षण करण्यासाठी तिमाजी नावाचा माळी होता. रात्री तो खळ्याच्या जवळ झोपला होता. एकदम त्याला गाढ झोप लागली. रात्रीचे दोन वाजले, कुंभाराची दहा-वीस गाढवे खळ्यावर आली आणि दाणे खायला लागली. राखणदार झोपी गेला म्हणून गाढवांना खूप आनंद झाला. ती जोंधळ्याच्या राशीमध्ये तोंड बुडवून जोंधळा खाऊ लागली.

हे मारुतीपंत महाराजांचे होते भक्त, म्हणून महाराजांना लीला करणे भाग होते. क्षणात ते मोरगावाला गेले व तिमाजीला त्यांनी हाक मारली. ''जागा हो ! बघ गाढवं किती शिरली आहेत'' शेतात असे मोठ्याने बोलून तिमाजीला जागे केले आणि महाराज अंतर्धान पावले ! तिमाजी म्हणाला मनाशी की, मालक रागावेल आता. पिकांचे रक्षण करण्यासाठीच मला ठेवले, आता मी विश्वासघात केला असे होईल. गाढवांनी निम्म्याहून अधिक रास खाल्ली आहे. तिमाजी इमानी

होता. त्याला हळहळ वाटली. त्याने ठरविले की उद्या सकाळी आपण मालकाला सांगूया. त्याने पाय धरले मारुतीपंताचे, ''मालक माझ्या झोपेने बुडविले, रास खाल्ली गाढवांनी, तुम्ही खळ्यामध्ये या ना बघायला'', मारुतीपंत म्हणाले, ''मी आत्ता शेगावी चाललो आहे. मला तिळभर सुद्धा आत्ता वेळ नाही. उद्या सकाळी आलो ना की येऊन बघतो मळ्यात''. सकाळी दहा ते अकराच्या सुमारास मारुतीपंत शेगावी दर्शनासाठी पोहोचले. महाराज आसनावर बसले होते समोर जगू पाटील व बाळाभाऊ होते. जगू पाटलांच्या बाजूला मारुतीपंत बसले. मारुतीने दर्शन घेताच, स्मितहास्य करुन महाराज म्हणाले, तुझ्यासाठी काल रात्री मला त्रास झाला रे, तुम्ही माझे भक्त होता, राखण करण्यासाठी झोपाळू नोकर ठेविता आणि स्वतः खुशाल घरी आरामात झोपता. काल रात्री खळ्यात तिमाजी झोपी गेला व मग गाढवांचा सुळसुळाट झाला आणि ते रास भक्षू लागले. मग मी येऊन तिमाजीला जागे केले झोपेतून ! अशी खूण पटताच मारुतीने हात जोडून महाराजांच्या चरणावर मस्तक ठेवून वंदन केले. महाराज, जे जे काही आहे ना ते सर्व तुमचे आहे हो. माझे काही नाही ह्यात. माऊली, आम्हांला सर्वस्वी आधार तुमचाच आहे. लेकरांचा अवघा भार कसा मातेच्या शिरी असतो अगदी तसे. तिमाजी नुसता नावाला नोकर आहे व्यावहारिक दृष्टीने. ब्रम्हांडाचे संपूर्ण रक्षण तुम्हीच करता ना. मी तुमचं लेकरु आहे म्हणून तुम्ही खळ्यात गेलात ना मोरगावी आणि खळ्यातील धान्याचे रक्षण केलेत. अशीच कृपा निरंतर ठेवा माऊली ! आत्ताच मी मोरगावला गेलो की त्या तिमाजीला कामावरुन काढून टाकतो. असं मारुती बोलल्यावर महाराजांना कौतुक वाटले. महाराज म्हणाले त्यावर छे छे ! वेड्या, अरे तिमाजीला अजिबात काढू नकोस.

तिमाजी हा ईमानी व प्रामाणिक नोकर आहे. खळ्यात गाढवे बघून तो दुःखी झाला हे मी तेव्हाच जाणिले आणि रात्रीची हकिकत सांगण्यासाठी तो सकाळी आलेला ना, तेव्हा तूच सांगितलेस की उद्या येऊन शेतात बघतो सकाळी. असे गुरुवचन ऐकल्यावर मारुतीला आश्चर्य वाटले. बघा संतांचे कर्तृत्व किती थोर ! अंतर्ज्ञानाने महाराजांनी जाणले की, खळ्यात गाढवे आली आहेत. भक्त अनेक अगणित, पण प्रत्येकावर महाराजांचे बारीक लक्ष असते. हे आपण जाणायला हवे आणि आपली कायिक, वाचिक व मानसिक कर्मे उत्तम ठेवायला हवीत.

शके १८१६ ला महाराज बाळापुरात असताना एक गोष्ट घडली. श्रोते हो, ती ऐका आता. तिथे सुखलाल बन्सीलालाची एक बैठक होती चालू. त्या बैठकीसमोर महाराजांची स्वारी आनंदात बसलेली. मूर्ती अवघी दिगंबर, अंगावर वस्त्र तिळभर नव्हते. ते पाहून भक्त भाविक जाता येता महाराजांना वंदन करत होते. तो होता हमरस्ता, बाजारपेठेचा, त्या रस्त्यावरुन नारायण आसराजी नावाचा एक हवालदार चालला होता. त्याने महाराजांना दिगंबर अवस्थेत पाहिले आणि त्याचे डोकेच फिरले. तो म्हणू लागला की ''हा नंगाधूत मुद्दाम इथे बसला आहे रस्त्यावर. हा साधू नाही तर भोंदू बाबा आहे''. तो महाराजांजवळ जाऊन अद्वातद्वा बोलू लागला. ''लाज नाही का वाटत रे तुला, रस्त्यावर असा बसतोस ते ! हे घे त्याचे प्रायश्चित्त'' असे म्हणून तो महाराजांना काठीने मारु लागला. महाराजांच्या पाठीवर, पोटावर वळ उमटू लागले. तरी तो हवालदार थांबत नव्हता. ते बघून एक गृहस्थ आपल्या दुकानामधून धावत आला. ज्याचे नाव हुंडीवाला होते. तो म्हणू लागला हवालदारा, अरे तू एकदा विचार कर हे थोर पुरुष आहेत. हे भक्तांचे कैवारी श्रीहरी आहेत. या कृत्याने तुझा अंत जवळ आला आहे. आजारी माणूस मृत्यू जवळ करण्यासाठी पथ्य मोडतो तसे हे आहे. आता तरी डोळे उघड अंतरमनाचे, महाराजांची माफी माग !

हवालदार उद्दामपणे म्हणाला, माफीचे कारण अजिबात नाही. कावळ्याच्या शापाने ढोर नाही मरत. अशा ढोंग्याला मारण्याचा ईश्वर गुन्हा नाही मानणार. पण पुढे हवालदार पंचत्वात विलीन झाला त्या बाळापूर नगरीत. आपले स्वतःचे कर्म आपले प्रारब्ध ठरवीते असते. एका पंधरवड्यात हवालदाराचे सर्व जवळील नातेवाईक पण भस्मीभूत झाले हवालदाराने साधूला ताडिले म्हणून.

नगर जिल्ह्यात प्रवरा नदीच्या काठावर संगमनेर गाव वसलेले आहे. छान टुमदार गाव आहे. हरी जाखडी ह्या गावचा. यजुर्वेदी ब्राम्हण म्हणून गावोगावी फिरुन तो आपला उदरनिर्वाह चालवीत असे. तो एक दिवस फिरता-फिरता शेगावी आला खास गजाननाच्या दर्शनासाठी. आल्यावर त्याने महाराजांना वंदन केले. स्वामींच्या पायाजवळ बसला. हजारो लोक रोज महाराजांचे दर्शन घेत. कोणी ब्राम्हणभोजन घालत. कोणी खडीसाखर वाटून केलेला नवस फेडत असे. हरी मनात म्हणाला, माझे दैव किती खडतर आहे की, हा केवढा ज्ञानराशी आहे आणि ह्याच्या पायांशी येऊन असे विन्मुख जाणे मला भाग आहे. आज अन्न मिळाले, उद्याचे काय माहीत, असे करत आजपर्यंत चालले. संग्रहासी नाही माझ्या धन. शेती नाही, मळा नाही. माझ्याकडे आणि मी नाही विद्वान मग मला मुलगी कोण देईल? स्वामी गजानना, संसारसुखाची तीव्र इच्छा माझ्या मनी आहे. ती तू पूर्ण कर. मला लेकरे व्हावीत, प्रथम कुलीन आज्ञाधारक बायको मिळावी. असा तो विचार करत असतानाच महाराज त्याच्या अंगावर थुंकले. म्हणाले, संसार सुटण्यासाठी लोक माझी पूजा करतात, पण ह्याने माझ्याकडे संसारसुखच मागितले. पाहा जगाची रीत कशी आहे. जाखड्याकडे बघून महाराज वदले, तू जे जे सांप्रत काली इच्छिले आहेस, ते अवघे पूर्ण होईल. सुखाने संसार कर, जा आता घरी. ह्या वेड्याला लक्षात ठेव ! विसरू नकोस मला. असे सांगून प्रसाद म्हणून थोडे धन महाराजांनी त्याला दिले. स्वतःचे लग्न करण्यासाठी. हरी

जाखड्याचा सुखी संसार संगमनेरी झाला. संतवाणी खोटी कशी ठरेल सांगा.

असेच एक निमोणकर, गोविंदाचे कुमार, ज्यांचे रामचंद्र नाव होते. ओव्हरसिअरच्या हुद्द्यावर होते. बेंद्रे वासुदेव सर्व्हेअर होते त्यांच्याबरोबर. मुकना नदीच्या इथे ते आले, सह्याद्री पर्वताच्या डोंगरात हा मुकना नाला आहे. इगतपुरी तालुका व नाशिक जिल्ह्यामध्ये. फळांनी लगडलेले वृक्ष, वन्य पशू तिथे मोकळेपणाने फिरत असत. तर अशा जलप्रवाहाला कपिलधारा नाव होते. तेथे पर्वणीस भाविक स्नानाला येत असत. तीर्थ म्हणून नावलौकिक होता. अशाच एका पर्वणीस निमोणकर गेले स्नानाला. थोडाफार योगाभ्यास त्यांना येत होता, पण योगाभ्यास शिकवणारा गुरु त्यांना मिळत नव्हता. सतत नाही, नाही असेच लोक सांगत होते. म्हणून निमोणकर अगदी हताश झालेले.

तोच कपिलधारेवर त्यांना एक मनुष्य दिसला. त्याचे हात सहज गुडघ्याला लागत होते. उंच बांधा होता व मुद्रा शांत होती. ध्यानस्थ बसले होते. त्यांना निमोणकरांनी दंडवत घातला. खूप वेळ झाला तरी योगी काही बोलले नाहीत. सूर्यास्ताची वेळ जवळ येऊ लागली. पोटी अन्न न मिळे तिळभर. घर राहिले खूप दूर. कपिलधारेचे धरून नीर पोटात, तुंब्यात घेऊन गोसावी निघाले. तें निमोणकर म्हणाले, महाराज, माझा किती अंत बघताय, माहीत असेल तर मला योगाभ्यास शिकवा ना थोडा. अखेर सूर्यास्ताच्या वेळी महाराज म्हणाले, हा चित्रपट घेऊन. जो त्यावर जी सोळा अक्षरी मंत्र लिहिला आहे, त्याचा निरंतर जप कर, मंत्रप्रभावाने थोडाफार योग येईल तुला. एक तांबडा खडा देऊन महाराज गुप्त झाले व पुढे ते त्यांना नाशिक येथे गंगेवर भेटले. त्यांना बघताच क्षणी निमोणकर धावत गेले व म्हणाले, महाराज, मला कंटाळळात का ? आपुल्या गावाला मला न सांगताच गेलात. महाराज डोळे मोठे करुन म्हणाले, तांबडा खडा

देऊन मी माझे नाव सांगितले की, नर्मदेचा गणपती तांबडा असतो, तू मूळचाच मूढमती आहेस.

मी राहतो शेगावला. गजानन माझे नाव आहे.

धुमाळ सदनापर्यंत चल माझ्याबरोबर, पुन्हा तुला भेटीचा योग होईल. महाराज मध्येच गायब झाले. निमोणकर इकडे-तिकडे बघून कंटाळले. कंटाळून धुमाळाच्या घरी आले. धुमाळाच्या घरी आल्यावर त्याने महाराजांना ओसरीवर बसलेले पाहिले. धुमाळाला निमोणकरांनी सगळी हकिकत सांगितली. धुमाळाला खूप आनंद झाला. महाराज म्हणाले, निमोणकरा, तुला जो तांबडा खडा दिला आहे. तो पाटावरी ठेवून त्याची रोज पूजा सद्‌भावनेने निरंतर कर, या साधनेने तुला योगाभ्यास येईल आणि तेच सत्य झाले. योगाभ्यासात निमोणकर निपुण झाले.

शेगावचा एक रहिवासी तुकाराम कोकाटे. जन्माला येताच त्याची संतती यमसदनास जात होती. म्हणून त्याने समर्थांना नवस केला. महाराज, जर माझ्या संततीला दीर्घायुष्य दिलेत तर एक मुलगा तुम्हांला अर्पण करेन. महाराजांनी त्याचे मनोरथ पूर्ण केले. दोन-तीन मुले झाली. पण तुकाराम नवसाबद्दल विसरुन गेला. थोरला मुलगा नारायण, त्याला रोग झाला. पण औषधोपचार केला तरी त्याला गुण आला नाही. नाडी बंद होऊ लागली. दृष्टी कमी झाली. ती मुलाची स्थिती पाहून तुकारामाला नवसाची आठवण झाली. तुकाराम म्हणाला, महाराज, जर तुम्ही माझ्या पुत्राला वाचवलेत तर तुम्हांला अर्पण करेन तुमची सेवा करण्यासाठी.

असे वचनबद्ध होताच, नाडी आली ठिकाणी. हळूहळू डोळे उघडून तो बालक बघु लागला. व्याधी बरी झाल्यावर नारायणास त्याने मठावर आणून सोडले नवस पूर्ण करण्यासाठी. तो नारायण अजूनही आहे शेगावी. म्हणून महाराजांना केलेला नवस कोणीही चुकवू नये.

आषाढ महिन्यात महाराज पंढरपुरी हरी पाटलास घेऊन गेले. महाराजांनी चंद्रभागेच्या तीरी स्नान केले आणि म्हणाले, पंढरीनाथा, हे रुक्मिणीकांता, माझी विनंती ऐक. तुझ्या आज्ञेने आजवर, भुमीवर भ्रमण केले, जे जे भाविक होते त्यांचे मनोरथ पूर्ण केले. पण आता विठुराया, अवतारकार्य संपले. आता जाण्याची आज्ञा असावी. देवा ! मी भाद्रपदमासी वैकुंठा जाऊ इच्छितो ! तुझ्या चरणी अक्षयरुपी राहायचे आहे. असे म्हणून समर्थांनी हात जोडले विठ्ठलापुढे व त्यांच्या नयनी अश्रू आले. हरी पाटील हात जोडून विचारू लागला, ''दयाघना, अश्रू का हो सद्‌गुरुराया. तुम्हांला काय दुःख झाले सांगा''. क्षणाचाही विलंब न करता, हरी पाटलाचा हात धरून महाराज म्हणाले, ह्याचे मर्म तुला अत्ता कळणार नाही. त्याचा विषय खोल आहे. इतकेच सांगतो की, संगत आता माझी थोडीच. चल, तुमच्या पाटील वंशाला शेगावी काही कमी पडणार नाही. हरी पाटलाचे मन चिंतेने व्याप्त झाले. त्याने ही हकीकत मठात मंडळींना सांगितली.

श्रावणमासानंतर महाराजांचा देह क्षीण होत गेला. पुढे भाद्रपद महिना आल्यावर गणेशचतुर्थीच्या दिवशी भक्तांना म्हणाले, गणपती बोळवण्यासाठी तुम्हा मठात या. चतुर्थीला साग्रसंगीत पूजा करा, नैवेद्य समर्पण करा आणि दुसऱ्या दिवशी जलामध्ये विसर्जन करा. जो दिवस आला तो साजरा केला पाहिजे. दुःख अजिबात करू नका. आम्ही कायमच इथे सूक्ष्म रुपात स्थित आहोत. तुमचा विसर मला पडणार नाही.

हे शरीर आहे जे वस्त्रापरी ते बदलण्याचा निर्धार आहे.

मी गेलो असं मानू नका. भक्तीत अंतर आणू नका.

कधीही मला विसरु नका. मी इथेच आहे. महाराजांनी बाळाभाऊचा हात धरुन त्याला आपल्या स्थानावर बसविले.

चतुर्थीचा दिवस आनंदात साजरा झाला.

मला कधीही विसरु नका, भक्तीत पूर्ण भाव ठेवा असे म्हणून योगविद्येने महाराजांनी प्राण मस्तकी रोधला.

त्या महात्म्याने भाद्रपद शुद्ध पंचमी शके १८३२ रोजी साधारण नाम संवत्सरास, गुरुवारी प्रहर दिवसाला प्राण मस्तकी रोधिला.

जय गजानन, अशा प्रकारे सच्चिदानंदचरणी लीन झाले.

देहाचे चलनवलन मावळून गेले. स्वामींना समाधिस्थ पाहून भक्तगण हळहळले. पुकार झाला गावामध्ये, की स्वामी झाले समाधिस्थ. साक्षात्कारी चालताबोलता श्रीहरी गेला. आता आम्हांस त्राता कोण ?

श्रीपतराव कुलकर्णी म्हणाले, लोकांना दर्शनासाठी येऊ दे मठात. आज पंचमीचा दिवस आहे. आज नका देऊ त्यांना समाधी. बंकट, विष्णुसा, हरी पाटील सर्व मंडळी मठात गोळा झाली.

गोविंद शास्त्री डोंगणगावचे विद्वान होते. ते म्हणाले, स्वामी त्यांच्या सर्व भक्तांना निश्चित दर्शन देतील. त्याची प्रचिती पाहावया कुठे लांब जायची गरज नाही. त्यांच्या मस्तकी लोणी ठेवा. ते वितळू लागेल. एक दिवसाची काय कथा ? वर्षभर तसेच राहतील. पण त्यांना अशा स्थितीत ठेवणे हे अनुचित आहे. ते सर्वांनी मान्य केले. स्वामींपुढे सर्वांनी भजन मांडिले. हजारो भक्तगण जमले. भक्तांना स्वप्नामध्ये दृष्टांत देऊन स्वामींनी समाधीची गोष्ट सांगितली. ऋषिपंचमीला अपार मेळा जमला.

दिंड्या, भजन गजर विठ्ठलनामाचा, तुळशी, बुक्का, गुलाल, फुले भक्त उधळू लागले. फुलांखाली महाराज झाकून गेले. बर्फी, पेढे अपरिमित, अशी रात्रभर मिरवणूक शेगावी सूर्य उगवताच मठात परत आली. समाधीच्या जागेवर मूर्ती नेऊन ठेवली. रुद्राभिषेक केला

अखेरचा. पंचोपचार पूजा केली. आरती झाली. भक्तांनी नामगजर केला गजाननाच्या नामाचा. जय जय अवलिया गजानना ! हे नरदेहधारी नारायणा! अविनाशरुपी आनंदघना! अखेरचे दर्शन सर्वांनी घेतले. मीठ, अर्गजा, अबीराने भरली गार. शिळा लावून भक्तांनी द्वार बंद केले. दहा दिवस तिथे आराधना चालू होती.

असंख्य लोकांनी प्रसाद सेवन केला. खरंच संतांचा अधिकार वेगळा. सार्वभौम राजेच ते. अशा प्रकारे श्रीगजानन विजय ग्रंथ कथासाराचा एकोणिसावा अध्याय इथे पूर्ण होतो.



## श्रीगजानन विजय कथासार - अध्याय २०वा

श्रीगणेशाय नमः। गजानना, तू खरंच भक्तांचा कैवारी आहेस. तुझ्या भक्तीने भक्तांचे जीवन हे सार्थकी लागले. जसा मनुष्य चांगल्या आचार-विचारांशिवाय अपूर्ण आहे, तसाच तो तुझ्या सात्त्विक भक्तीशिवाय पूर्ण होणार नाही.

महाराज शेगावी समाधिस्थ झाल्यावर, लोक म्हणू लागले की, आता या शेगावी काय राहिले? आता इथे फक्त माती आहे. समुद्राचे पाणी आटले तर कोण करणार त्याचे कौतुक? देव जर देव्हाऱ्यात नसेल तर माळा बांधणेच व्यर्थ आहे, असे कित्येक लोक म्हणत, पण तो त्यांचा भ्रम होता. महाराजांची अदृश्य ज्योत तिथेच आहे.

गणपत कोठाडे नावाचा एक भाविक गृहस्थ होता. रायली कंपनीचा हा एजंट आणि शेगावी त्याचे दुकान होते. नित्यदर्शनासाठी तो मठात येत असे. समाधीपाशी बसून सूर्यास्ताच्या वेळी स्तवनरुपी भक्ती महाराजांना अर्पण करत असे. एक दिवस त्याला वाटले की, समाधिवर आपण उद्या विजयादशमीला अभिषेक करुया, ब्राम्हणभोजन घालूया. अभिषेकाची सर्व तयारी त्याने केली. मठामध्ये मोठ्या प्रमाणात शिधा पाठविला. त्याची पत्नी म्हणाली, अहो तुमच्या हातात हाडं नाहीत, मग एवढा खर्च का? उद्या विजयादशमी आहे तर मुलांना कपडे, दागिने आणा. हे अभिषेक, ब्राम्हणभोजन वरचेवरी करणे योग्य आहे का? मी आहे  लंकेची पार्वती. फुटका मणी पण अंगावर नाही माझ्या. ही गृहस्थाची रीत योग्य का? धनाचा संचय करायला हवा. हे बायकोचे बोलणे त्याला रुचले नाही. तो म्हणाला, प्रपंचाहून मला परमार्थ श्रेष्ठ वाटतो. तोच त्याच्या बायकोला रात्री स्वप्न

पडले, उगाचच नवऱ्याला छळू नकोस. तो करतो ते त्याला करु दे. मला सांग त्यात तुझे काय जाते ? अशाश्वताचे प्रेम वेडे, बाळगू नकोस. अगं धन हे भूमीवरच राहते. पण पाप-पुण्य माणसाबरोबर जाते. अभिषेक ब्राम्हणभोजन हे पारमार्थिक पुण्य आहे. गणपतरावाने दसऱ्याच्या दिवशी आनंदाने पूजन केले. उत्तम खर्च ही केला. गणपतरावाची पूर्ण निष्ठा समर्थपदी जडली. ती पहिल्यापासूनच शुद्ध स्वरुपाची होती.

लक्ष्मण हरी जांजळला असाच एक अनुभव आला. काही कामासाठी तो मुंबईला गेला होता. पहिल्यापासूनच हा लक्ष्मण महाराजांचा भक्त होता. घरच्या कटकटीने तो वैतागला होता. त्याचे मन त्रासले होते.

काही व्यापाराच्या कामानिमित्त मुंबईला आलेला. बोरीबंदरवर लक्ष्मण घरी जाण्यासाठी आला, तर एक परमहंस त्याला भेटले. अजानुबाहू होते, ॐकाराचा जप मुखातून सतत होता चालू. ते लक्ष्मणाला म्हणाले, तू गजाननाचा शिष्य आहेस ना, मग असा हताश का होतो आहेस. तू तुझ्या घरी पुण्यतिथी ४०० ब्राम्हणांना भोजन देऊन साजिरी केलीस अमरावतीला, त्यावेळी गोपाळराव पेठकर आणि बापट मास्तरांचा काय प्रकार घडला ते आठव मना ! पुत्रशोक बापटाला झालेला तरी तो प्रसादासाठी तुझ्या घरी आला. पेठकराचे ब्राम्हण भले कसे राहिले सांग ? अरे गजानन स्वामी त्यांच्या स्वप्नात गेले. त्यांना उपदेश करुन त्यांना प्रसादासाठी आणले. हे कसे विसरलास तू ह्यावेळी, सांग! खुणेच्या गोष्टी ऐकून लक्ष्मण साशंक झाला. कोण असावी ही व्यक्ती, समजत नाही. पण आदराने त्याने त्यांना वंदन केले. पाहता-पाहता ती व्यक्ती दिसेनाशी झाली . लक्ष्मण

मग घरी येऊन वागू लागला पहिल्याप्रमाणे. दरवर्षी त्याने पुण्यतिथीला ब्राम्हण भोजनाचा प्रारंभ केला.

माधव मार्तंड जोशी कळंबमधीला कसूर गावामध्ये जमीनमोजणीसाठी आलेले. हे सरकारी नोकर होते. रेव्हेन्यू ऑफिसर म्हणून काम सांभाळत होते. दिवसभर त्यांनी मोजणीचे काम केले आणि मग त्यांना संध्याकाळी शेगावी जाऊन महाराजांच्या समाधीचे दर्शन घ्यावे अशी इच्छा निर्माण झाली. त्याने शिपायाला आज्ञा केली की, लवकर दमणी जोड, रात्री शेगावला राहू. उद्या परत येऊ. तो शिपाई म्हणाला की, अहो साहेब, आभाळ भरून आले आहे, ह्याचा विचार एकदा करा ना, मन नदीला ना पाणी खूप आहे आणि आता ते गढूळ झाले आहे. माधवराव म्हणाले, होऊन जाऊ आपण नदी पार. बघ आता कुठली कारणं देऊ नकोस. प्रवासाला सुरुवात झाली. दमणी जशी नदीत घातली तसे पाणी एकदम आले. तटापर्यंत जायला वेळच नाही झाला. पाण्याचा वेग वाढून क्षणामध्ये नदीला भयंकर पूर आला. जोशी घाबरले. शिपाई म्हणाला, साहेब, इथेच आले मरण हो, आता काही उपाय नाही. जोशींनी महाराजांचा धावा सुरू केला. अशा संकटी तुझ्याशिवाय आमच्या प्राणांचे रक्षण कोण करणार, पुराणामध्ये कथा ऐकली आहे, जहाज बुडत होते तेव्हा संतांनी हात देऊन रक्षण केले. आता गजानना, तू आमुचे रक्षण कर ना. तेवढ्यात दमणीत पाणी आले. बैल घाबरले. जोश्यांनी शिपायाला पाठी बोलावले व म्हणाले की, महाराजांचे स्तवन कर. ते आपल्याला ह्यातून तारुन नेतील. जोशी म्हणाले, समर्था, अगाध आहे तुझी सत्ता. आम्हांला तार किंवा मार. तुला जे योग्य वाटेल ते कर. दोघांनी डोळे मिटले व महाराजांचा धावा करत होते. तो काय आश्चर्य! दमणी

आपोआप पैलतीरी येऊन थांबली. दोघांनाही खूप आनंद झाला. दमणी शेगावच्या काठावर उभी होती. रात्री पोहोचले ते शेगावी. समाधीचे दर्शन घेऊन पालखी सोहळा पाहिला. बाळाभाऊला सर्व प्रसंगाचे वर्णन केले. बाळाभाऊकडे ब्राम्हणभोजनासाठी दक्षिणा दिली. कामामुळे त्यांना सुट्टी नव्हती. म्हणून त्यांनी बाळाभाऊला विनंती केली.

एक यादव गणेश म्हणून हिंगणीचा राहणारा, वऱ्हाडामध्ये कापसाचा व्यवहार करत होता. एके वर्षी त्याला दहा हजारांचा तोटा झाला. त्या चिंतेने तो क्षीण झाला. मनीची चिंता त्याच्या सुटत नव्हती. फायदा व्हावा यासाठी तो सतत काहीतरी खटपट करत होता. एकदा तो कामानिमित्त वर्ध्याला गेलेला विनायक आसिरकरच्या घरी उतरला, तेवढ्यात तिथे एक भिकारी भिक्षा मागायला आलेला. डोक्यावर टोपी, मळकट पोशाख होता, कंपवायूने शरीर कापत होते. यादव ओसरीवर बसला होता. त्या भिकाऱ्याने यादवाच्या पुढे भिक्षापात्र केले आणि म्हणाला, घाल भिक्षा काहीतरी. यादव मनात म्हणाला, हा भिकारी लोचट आहे नुसता. त्याला नीट निरखून पाहिले तर यादवाला त्याच्यात गजानन महाराजांचा भास झाला. दृष्टी अत्यंत तेजंःपुंज होती. तो मनी शंका घेऊ लागला, महाराज इथे कसे येतील ? गजानन समजून त्याने भिकाऱ्याला दोन पैसे देऊ केले. तर भिकारी म्हणाला, गजाननासाठी शेरणी वाट गुळाची. नुसते वायदे (वादे/नवस) करतोस ते मी नाही आता मानणार. तोटा दहा हजारचा तुला व्यापारी झालाय ना ? त्याचा विचार मनात करुन रुपये दे मला लवकर, काढ खिशातून पाकीट. दे काढून. त्यानंतर विनायकराव तेवढ्यात घरी आत गेले तर महाराज म्हणाले, अरे का शंका घेतोस माझ्या विषयी, कपडे काढून तू उभा राहा माझ्यासमोर. अरे तू मला

मुलासारखा आहेस. तुझ्या अख्या अंगावर दृष्टी माझी पडू दे म्हणजे व्याधी तुझी बरी होईल यादवा. फिरवला नखशिखांत अंगावरुन त्याने हात, इतक्यात आसिरकर ओसरीवर आले. यादवाने अख्ख्यागावात शोध घेतला. पण तरी त्याला न सापडला भिकारी. शेवटी त्याने मनात निश्चय केला की, हा नक्कीच गजानन होता. त्या दिवशी गावात जेव्हा कापसाच्या पेट्या विकल्या गेल्या आणि अधिक फायदा त्याला त्या दिवशी झाला, तेव्हा मनी यादव आनंदला म्हणाला, महाराज, खरंच तुम्ही भक्तरक्षणासाठी खरंच कृपाळू आहात.

राजाराम कवर जो डॉक्टर होता, खामगावी, त्याची तेल्हाऱ्याला बदली झालेली म्हणून तिथे जाण्याला तो सहकुटुंब निघाला. सहकुटुंब तो मठात आला. महाराजांच्या समाधीचे दर्शन घेऊन सूर्यास्ताच्या वेळी तो निघत होता. बाळाभाऊ जे मठाधिपती होते ते म्हणाले, अहो मी तुम्हांला विनंती करतो की, प्रसादाचे जेवण घेऊन जा. आजपर्यंत तुम्ही इथून कधीच उपाशी काही न घेता गेला नाही, मग आजच तुम्ही असे मनी का आणले? कवर म्हणाला अहो यावेळी मला जरा घाई आहे. उगीच आग्रह नका करु हो. बोलल्याप्रमाणे डॉक्टर तेल्हारयास जायला निघाला. मुलांबरोबर दमणीतून पुढे जात होता. रात्रीची वेळ अंधारी होती. वाटेत एकदम शांतता, भव्य तलावाच्या काठावर गाडी उभी होती. आजूबाजूला काटे होते. गाडीवाला कवराला म्हणाला, आपला रस्ता चुकला आहे. कवराला आश्चर्य वाटले. गाडीवाल्याला तो म्हणाला की, तुम्ही तेल्हाऱ्याचे ना? मग असे कसे झाले? गाडीवाला हात जोडून म्हणाला, साहेब, मला नका ओरडू. संपूर्ण रस्ता मला पाठ आहे. बैल कुठे वळले नाहीत. ते नीट आले. पण तलाव बघून मलाच आश्चर्य वाटले. कवर मनामध्ये समजून गेला, हे समर्थांनीच घडवून

आणले आहे. मी बाळाभाऊच्या विनंतीला मान दिला नाही ना. म्हणून रस्ता चुकला. आता वाट कशी शोधायची ? गजानना, तुजवाचून आता कोण त्राता ! रक्षण कर माझं. तेवढ्यात तळ्याच्या दुसऱ्या बाजूला घुंगुरमाळांचा आवाज डॉक्टराच्या कानी पडला. तो गाडीवाल्याला म्हणाला, अरे येथून रस्ता नाही फार दूर. काट्याकुट्यांमधून गाडी नीट नेली. हमरस्ता लागल्यावर डॉक्टरने चौकशी केली तर समजले, हे शेगावचे शिवार आहे. डॉक्टर शेगावी सूर्योदयाच्या वेळी परत आला. संपूर्ण वृत्तान्त त्यांनी बाळाभाऊला सांगितला. प्रसाद ग्रहण करुनच मग डॉक्टर तेल्हाऱ्याला गेला. म्हणूनच प्रसादाला कधी नाही म्हणू नये.

रतनसा नावाचे गृहस्थ होते. जातीने भावसार, त्यांचा मुलगा दिनकर, मुलगा एक वर्षाचा होता. त्याला सोबणीचा रोग झालेला. लोक म्हणत की त्याला वेड लागले. अजिबात रक्त त्याच्या अंगात राहिले नव्हते. नुसती हाडे दिसत होती. दूधपाणी घेईना. सतत ताप होता. वैद्य रतनसाला म्हणाले हा मुलगा वाचणे अशक्य आहे. रतनसा हे ऐकून रडू लागले. हातपाय मुलाचे गार झालेले. नेत्रतेज मंदावलेले. नाडी लागत नव्हती. अशा स्थितीमध्ये रतनसांने हातात मुलाला उचलले व समर्थांच्या पुढे नवस केला की, मी ५ रुपयांची शेरणी वाटेन तुम्हांस, तुम्ही मला अनुभूती द्या. मी तुमचेच लेकरु आहे. माझी उपेक्षा करु नका. माझे मूल तुझ्या दारात मृत पावले तर वऱ्हांडप्रांतात तुझी नाचक्की होईल. स्वामी गजानना, माझा पुत्र इथे उठला नाही तर मी इथेच, माझे प्राणत्याग करेन. थोडावेळ होतो न तोच तो मुलगा हातपाय हालवू लागला. नाडी लागायला लागली. सर्व लोक आनंदले. दिनकर थोड्या दिवसांत पूर्ववत झाला. नवस असेल श्रद्धायुक्त तर त्याचे फळ न्यायाने मिळतेच.

दादा कोल्हटकरांचा मुलगा, ज्याचे नाव राजा, तो आहे प्रसाद समर्थांचा. रामचंद्र पाटलांची कन्या, चंद्रभागा जिचे नाव, ती गरोदर असताना प्रसूतिच्या वेळी तिला खूप त्रास होत होता. लाडेगावाहून ती माहेरी आली. पण मोठ्या कष्टाने प्रसूती झाली. चंद्रभागेचा ज्वर उतरतच नव्हता. डॉक्टर उपचार करुन थकले, तात्पुरता गुण येई पण मुळात व्याधी शमली नव्हती. वारंवार चंद्रभागा आजारी पडत असे. वैद्य कोणी म्हणत, नळसंग्रहणी, कोणी म्हणे क्षय. एकाचा मेळ एकाला नाही. पाटलाने मनाशी विचार केला की आता वैद्य गजानन श्रेष्ठ. नियमितपणे अंगारा तिला महाराजांचा लावत असे. हळूहळू तिला गुण येऊ लागला. जिला उठवत नव्हते, तीच चालत दर्शनाला आली समर्थांच्या. हे महत्त्व आहे अंगाऱ्याचे.

जानकीबाई होत्या त्यांना वातविकार झालेला. वारंवार त्यांचे पोट दुखे. असे रोज होई. शेवटी त्याचा परिणाम मेंदूवर झाला. वेड्यापरी त्या वागू लागल्या. कधी उपाशी तर कधी जेवत. कोणी म्हणत भुताने झपाटले. भरपूर औषध उपचार झाले. गंडे बांधले. पाटील बायकोची सर्व सेवा करत असे. शेवटी त्याने ठरवले की आता गजाननाच्या इच्छेने होऊ दे. त्याने बायकोला सांगितले की उद्यापासून सकाळी तुझी आंघोळ झाली की तू समर्थांच्या मठाला प्रदक्षिणा घाल. तिने पतीचे वचन सर्वतोपरीने पाळले. तिच्या प्रदक्षिणा वाया गेल्या नाहीत. वातविकार जाऊन ती निर्दोष जाहली.

समर्थांच्या नंतर बाळाभाऊ बसले गादीवर. त्यांनीही भक्तांना खूप मार्गदर्शन केले. वैशाख वद्य षष्ठीस ते वैकुंठासी गेले. त्यांच्यामागून नारायण बसले गादीवर.

बाळाभाऊ जेव्हा वैकुंठासी गेले तेव्हा नारायणाला स्वप्न पडले. भाविकांचे रक्षण करण्यासाठी तू शेगावी जा ! असे स्वप्नात सांगून निघून गेले गजानन. त्यांनीही काही दिवस गादी चालवली. चैत्र शुद्ध षष्ठीला त्यांनी समाधी घेतली.

गजानन महाराजांच्या लीला अगणित आहेत. मी अज्ञान पामर आहे. माझ्या लेखणीने मी लिहिले, पण बुद्धी गजाननाने दिली. ह्यात माझे काहीच नाही, सर्व महाराजांचे श्रेय आहे. आज इथे ग्रंथ कथासाराचा कळसास पोहोचला.

कळसाध्याय पुढील आहे. गजानन विजय ग्रंथ कथासाराचा विसावा अध्याय इथे पूर्ण होतो.



माझ्या बुद्धीवरील तमोरुपी अंधार तूच दूर केलास.

२१वा अध्याय हा कळसाध्याय आहे. ह्यात पूर्ण कथासाराचे सार आहे.

''एकविधा निष्ठा ज्याची जडली गजाननपदी

त्याच्या दुःख संकटाची होळी होतेच.'' हे निःसंशय.

मंदिर बांधत असताना एक मजूर शिखरावर काम करत होता. एक मोठा दगड मिस्त्रीला देताना त्याचा तोल गेला. तीस फुटांवरुन तो खाली पडला. लोकांना वाटले, तो मेला. पण आश्चर्य म्हणजे त्याला काहीच लागले नाही. चेंडू कसा झेलतात तसे त्याचे झाले. मजूर म्हणाला, माझा झोक गेला, तेव्हा एकाने मला धरले, पण जमिनीला ज्या क्षणी माझे पाय लागले तेव्हा मला तो दिसला नाही. समर्थांनीच त्याला वाचविले.

रजपुताची एक बाई जयपूरहून आलेली. तिला भुताची बाधा झालेली. दत्तात्रेयांचा, तिला दृष्टांन्त झाला की, रामनवमीला तू शेगावी जा. तिथे संत सद्गुरु गजानन आहेत. ते तुला देतील पिशाचापासून मुक्ती. आपल्या दोन मुलांना घेऊन ती रामनवमीला शेगावी आली.

प्रतिपदेपासून उत्सवाला सुरवात झाली. सभामंडपाचे काम उत्सवानिमित्त तिथे चालू होते. मोठे-मोठे दगडाचे खांब उभे केले होते. श्रीरामजन्मानंतर प्रसाद मिळवण्यासाठी अपार गर्दी झाली. ती गर्दी रजपूत बाईला सोसली नाही. ती दगडाच्या खाबांच्या आश्रयी गेली. तर तो खांब तिच्या शरीरावर कोसळला. तिचा प्राण गेला असे वाटले. खांबाखाली लहान दोन मुले दिसली. दहा-वीस जणांनी खांब उचलला.

ख्रिश्चन पण शस्त्रविद्येमध्ये निपुण अशा लोबोबाई कडे तिला पाठविले. उपचार केल्यावर लोबो बाई म्हणाल्या, ह्यांना कुठेच मार लागला नाही. बाईचा प्राण वाचला.

भुतास खरी मुक्ती दिली गजाननाने.

असेच एका उत्सवात नाईकनवऱ्याच्या मस्तकावरी सोडीत होता मंडप तेव्हा लाकडी गील पडला. पण स्वामींच्या कृपेने कुठेही आघात झाला नाही. नाईकनवरा वाचला.

कृष्णाजी पाटलाचा पुत्र रामचंद्र. समर्थांचा परम भक्त. एक दिवस गोसाव्याच्या रुपात गजानन स्वामी त्याच्या घरी आले. अरे मला भूक लागली जेवायला दे ना असे म्हणून रामचंद्राला हाक मारली. रामचंद्र लगेच दारावर आला. तो भाविक होता. निरखून त्याने गोसाव्याला पाहिले तर गजाननाचा भास झाला. तो त्याला घरी घेऊन आला. जेवायला बसायला पाट दिला. पायांची पूजा केली. गोसावी पाटलाला म्हणाला, ''ऐक, तू कर्जाची चिंता करु नकोस. हेच सांगायला आलो. गोदावरी कधी उन्हाळ्यात कोरडी होते का सांग? सुग्रास भोजन दे मला. मर्जी वाटली तर एखादे पांघरुण घाल अंगावरी''. पाटलाने ताट वाढून आणले, गोसावी प्रेमाने जेवला. ५ रुपये दक्षिणा ठेवलेली बघून म्हणला, ''मला नको दक्षिणा. तू गजाननाच्या मठात योग्य ती सेवा कर. तुझी बायको सतत आजारी पडते ना, ती ही होईल बघ बरी. तुझ्या मुलाला बोलाव, त्याच्या हातात ताईत बांधतो. म्हणजे चेटूक, भूत ह्यांची बाधा होणार नाही. पाटीलकी तुझे वतन. त्याचा अति सावधपणे उपयोग कर. दांभिकाच्या नादी लागू नकोस. बाहेरुन फणसासारखा राहा पण मनातून गोड गरेच राहा. मी रात्रंदिवस तुझ्या पाठीशी आहे जाण''. असे म्हणून गोसावी जाऊ लागला. दरवाज्याच्या बाहेर पडता अंतर्धान पावला.

रात्री स्वप्नात येऊन महाराज गोसाव्याच्या रुपात आलेले ह्या वचनाचा महाराजांनी दृष्टांन्त दिला.

धन्य गजानन माऊली.

श्रीगजानन चरित्र हे पवित्र असून तारक आहे.

अनुभव येण्यासाठी सबळ निष्ठा हवी.

**ग्रंथाची अवतरणिका :**

**अध्याय १ला :**

- मंगलाचरण, कृष्ण मुसळादेवी वंदन.
- माघसप्तमीला समर्थ शेगावी आले.
- देविदासाच्या सदना जवळ प्रथम दिसले.
- बंकटलाल आणि दामोदर दोहो धन्य झाले महाराजांच्या दर्शनाने.

**अध्याय २राः**

- गोविंदबुवांच्या कीर्तनाचा उत्तरार्ध महाराजांनी पूर्ण केला.
- पितांबर शिष्यांला रस्त्यात चमत्कार दाखविला.
- बंकटलालच्या सदनी महाराज राहायला गेले.

**अध्याय ३राः**

- गोसाव्याने गांजाचा नवस केला.
- महाराजांनी त्याची इच्छा पूर्ण केली.

- तिथून गांजाची प्रथा पडली.
- जानरावांचे गंडांतर तीर्थ प्राशन करुन टळले.
- मृत्यूच्या प्रकारांचे कथन
- विठोबाला ढोंग करत असल्याने मार दिला.

**अध्याय ४था:**

- जानकीरामाने चिलिमीसाठी विस्तव नाकारला.
- चिंचवण्यात किडे पडले.
- जानकीरामाने समर्थांना केली विनंती.
- चिंचवणी पूर्ववत् झाली.
- चंदूचे उतरंडीवरील दोन कान्होले महाराजांनी स्वीकारले.
- चिंचोलीच्या माधवाला मोक्षप्राप्ती.
- शिष्यांकडून वसंतपूजेचा थाट केला.

**अध्याय ५वा:**

- महाराज पिंपळगावच्या शंकर मंदिरात पद्मासन घालून बसले.
- गुराख्यांनी सुंदर पूजा केली.
- बंकटलाल महाराजांना घेऊन शेगावी परत आला.
- महाराज भास्कराला तारावया अकोल्याला गेले.
- कोरड्या विहिरीला पाझर फुटला.

**अध्याय ६वा:**

- मळ्यात कणीसे खायला गेले असता महाराजांना मधमाश्या चावल्या.
- बंकट खरा भक्त पुढे धावला.
- महाराजांनी नरसिंगजींची भेट घेतली.
- वज्रभूषणावर कृपा चंद्रभागातीरी केली.
- मारुती मंदिरात राहायला समर्थ गेले.

**अध्याय ७वा:**

- पाटील मंडळींना समर्थांचा अधिकार समजला.
- उसाच्या चमत्काराने पाटलांचा अहंकार संपला.
- कडताजी पाटलाला भिक्या नावाचा पुत्र दिला.
- आम्रभोजन व्रत पाटलाने केले.

**अध्याय ८वा:**

- देशमुख-पाटील दुफळी माजली.
- खंडू पाटील निर्दोष सुटले.
- तेलंगी ब्राम्हणांना वेद म्हणून दाखविला.
- कृष्णाजीच्या मळ्यात महाराज राहू लागले.
- ब्रम्हगिरी गोसाव्याला नैनं छिन्दतिचे खरे रहस्य सांगितले जळत्या पलंगावर बसून महाराजांनी.

**अध्याय ९वाः**

- द्वाड घोडा शांत झाला.
- दासनवमीला बाळापुरी येऊन बाळकृष्णाच्या घरी जाऊन रामदासांचे दर्शन घडविले.

**अध्याय १०वाः**

- गणेशअप्पाने संसारसुख सोडून गजानन सेवेचे व्रत स्वीकारले.
- बाळाभाऊला उपरती छत्रीने मारुन परीक्षा घेतली. गणेश खापर्डे यांना शुभाशीर्वाद दिला.
- द्वाड गाय शांत केली.

**अध्याय ११वाः**

- भास्कराला कुत्रे चावले.
- श्यामसिंगाच्या अडगावी महाराज आले.
- वैकुंठासी गेला भास्कर.
- कावळ्यांना आज्ञा केली महाराजांनी.
- वाचवले गणूचे प्राण सुरुंग विहिरीतील उडवताना.

**अध्याय १२वाः**

- बच्चुलालाची सेवा स्वीकारली.
- पितांबर कोंडोलीला गेला.
- वठलेल्या आंब्याच्या झाडास पितांबराने पालवी आणली.
- भंडाऱ्यामध्ये पर्जन्य घोटाळा.
- श्यामसिंगाने समर्थांना सर्व इस्टेट अर्पण केली.
- प्लेगची गाठ पुंडलिकाची निमाली.

**अध्याय १३वाः**

- गोसावी गंगाभारतीचा महारोग शमला.
- बंडूतात्याला भूमीत धन सापडले.
- नौका फुटता नर्मदेने प्राण वाचविले.

**अध्याय १४वाः**

- माधवनाथाला शिष्याकडून विडा पाठविला.

**अध्याय १५वाः**

- शिवजयंती उत्सव.
- टिळकांना भाकरी प्रसाद पाठविला.
- गीतारहस्य ग्रंथ उदयास आला.
- श्रीधर काळे स्वदेशी राहिला.

**अध्याय १६वाः**

- पुंडलिकाला झ्यामसिंगाहस्ते पादुका पाठविल्या.
- छर्रा तुकारामाचा मंदिराच्या आजूबाजूची स्वच्छता १४ वर्षे करुन आपोआप पडला.

**अध्याय १७वाः**

- समर्थ गाडीतून नग्न गेले म्हणून खटला भरला.
- महेताबशा पंजाबला गेला.
- बापूरावाच्या पत्नीला भानामती पासूनवाचविले.

**अध्याय १८वाः**

- बायजाची कथा
- कवर डॉक्टरचा फोड बरा झाला
- बापुनाला विठुराया दर्शन घडविले.
- कवठे बहादुरच्या गावकऱ्याला मरीच्या आजारातून वाचविले.
- कर्मठ ब्राम्हणाने महाराजांच्या चरणी वंदन करुन अहंकाराला त्यागीले.

**अध्याय १९वाः**

- गोपाळ बुटीच्या इथून नागपुरातून हरी महाराजांना परत घेऊन आला.
- खळ्याचे संरक्षण केले.

- निमोणकरांना दर्शन दिले.
- हरी जाखड्याचे लग्न झाले.
- ऋषिपंचमीला महाराजांनी समाधि घेतली.

**अध्याय २०वा:**

- समाधिस्थापने नंतर पण भक्तांना विविध अनुभव आले.

**अध्याय २१:**

- समाधीचे काम पूर्ण करण्यासाठी सर्व भक्त वर्गणी गोळा करत होते.
- हजारो भक्तांनी वर्गणी दिली.
- गणाजी, गंगाराम, कुकाजी नंदन, हरी पाटील ही प्रमुख नावे.

मठाची उभारणी उत्तम झाली. खोल्या, स्वयंपाकघर, कचेरी अशा प्रकारे उत्तम मांडणी झाली. वेगवेगळ्या करांवर धार्मिक कर लावला. मठाच्या बांधणीसाठी लोकांनी धार्मिक कर आनंदाने दिला. शतचंडीचे मोठे कार्य किसनजी शेटजीने ठरविलेले. त्या दिवशी बंकटाची तब्येत बिघडली. सर्व भक्त काळजीत पडले. बंकटलाल आपल्या पुत्राला म्हणाला, घाबरु नकोस अजिबात. माझे तारणहार समाधीसी बसले आहेत. ते विघ्न येऊ देणार नाहीत, आणि तेच सत्य झाले.

एका बाईमधील पिशाचबाधा या शतचंडीमध्ये निमली. अनेक भक्तांनी समर्थांपुढे यज्ञ केले. महाराजांवरील निष्ठा कमी झाल्यावर शेगावामध्ये दुष्काळ आलेला. जेव्हा महाराजांवरील निष्ठा पूर्ववत झाली तेव्हा शेगाव परत सुखसंपन्न झाला. वर्षातून एकदा तरी महाराजांचे शेगावी दर्शन घ्यावे.

जो संकटकाळी श्रद्धेने ह्या कथासाराचे मनापासून पारायण करेल, त्याला महाराजांचे आशीर्वाद मिळतील. मनापासून हाक मारा. वरवरची तात्पुरती भक्ती नको. दिवस कोणताही ठरवा, पण भाव खरा ठेवा. २०२१ मार्च १३ एप्रिलला गुढीपाडव्याच्या दिवशी ह्या ग्रंथाचे अर्पण मी महाराजांना करत आहे. गुरुवारी एक तरी अध्याय वाचावा म्हणजे आपल्याभोवती सतत महाराजांचे कवच असेल. महाराज, अशीच कृपा सर्व भक्तांवर ठेवा.

हृदयापासून पूर्ण श्रद्धेने तुमची सेवा करण्याचा प्रयत्न केला आहे त्याचा स्वीकार करा.

२१ वा कथासाराचा अध्याय इथे पूर्ण होतो. इथेच कथासार पूर्ण झाले आहे.

